# करवंदें

(पत्र-संग्रह)

लेखक
नारायण गणेश गोरे

किंमत सव्वा रुपया

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

# अनुक्रमणिका





## करवंदें चाखण्यापूर्वी—

ज्या विद्यार्थि—वाचकांच्या हातीं प्रामुख्यानें पडावें म्हणून हें पुस्तक मी आज प्रसिद्ध करीत आहें त्यांच्याशीं सुरवातीलाच चार शब्द बोललेलें बरें, असें मला वाटतें.

ह्या पुस्तकांत एकंदर पंधरा पत्रें मुद्रित केलेलीं आहेत. त्यांतलें एक पत्र दिवंगत साने गुरुजींची पुतणी चिरंजीव सुधा हिला मीं गुरुजींच्या मृत्यूचें दुःख मनांत ताजें असतांना लिहिलेलें आहे. बाकींचीं सर्व पत्रें मी शुभाला, म्हणजे माझ्या मुलीला लिहिलेलीं आहेत. परंतु मुख्यतः शुभाला उद्देशून जरी ह्या पत्रांचें लेखन झालेलें असलें तरी माझ्या डोळ्यांसमोर केवळ शुभाच नव्हती. शुभाच्या वयाच्या विद्यार्थिनी व विद्यार्थी होते आणि त्यांना जणूं काय मनोमन साक्षी ठेवून मी हीं पत्रें लिहीत गेलों. शुभा निमित्तमात्र झाली. आणि तिला मध्यें ठेवून मी महाराष्ट्रांतील तिच्या समवयस्क अशा हजारों मुलामुलींशीं नातें जोडण्याचा यत्न केला.

मी सतत प्रवास करीत असतों. मीं हीं पत्रें जेथून लिहिलीं त्या गांवांच्या नांवावरून ही गोष्ट सहज लक्षांत येईल. प्रवासामध्यें नाना प्रकारचीं माणसें मला भेटतात. नानाविध चालीरीति बघावयास सांपडतात. अनेक रमणीय स्थळांचें दर्शन घडतें. आपला हा भारतवर्ष इतका विशाल, इतका पुराण, आणि इतका विविध आहे

कीं शेवटीं पाहणारा थकेल पण पाहावयाचें कांहीं संपणार नाहीं. पण हें सारें पाहावयाचें तर हिंडलें पाहिजे. विद्यार्थी—विद्यार्थिनींना हें कसें शक्य आहे ? त्यांतल्या त्यांत आपल्या देशासारख्या अतिशय गरीब देशांतील गरीब मुलामुलींनीं कसें जावें दूरदूरच्या प्रवासाला ? कोठून आणावे पैसे ? शाळेची फी, वह्या, पुस्तकें हींच जेथें परवडत नाहींत तर प्रवास कोठचा परवडणार ? म्हणून माझ्या मनांत आलें कीं आपणाला प्रवास करणें जर प्राप्तच आहे तर प्रवासाहून येतांना घरच्या मुलांना आपण जसा कांहींबाही खाऊ घेऊन येतों, त्याचप्रमाणें आपल्या नजरेस पडणाऱ्या भारताच्या अनंत रूपांपैकीं एखाद्या अर्ध्याचें चित्र दरखेपेला शुभासाठीं पत्ररूपानें पाठवीत असावें.ह्या मूळ कल्पनेला अनुसरून पत्रलेखन करतां करतां हा पत्र-संग्रह तयार झाला आहे. महाराष्ट्राचा व आपल्या विशाल भारताचा परिचय शुभाच्या व तिच्या बरोबरीच्या मुलांमुलींना व्हावा, त्यांची दृष्टि व मनें व्यापक बनावीं हा एक हेतु पत्रें लिहितांना माझ्या मनांत होता.

आतां पत्र हेंच माध्यम मीं कां वापरलें ह्याचाहि खुलासा केला पाहिजे. माझ्या मतें जेव्हां केव्हां आपणाला खेळीमेळीनें, आपुलकीनें आणि जिव्हाळ्यानें लिहावयाचें असेल तेव्हां पत्र हें माध्यम सर्वोत्कृष्ट होय. कल्पना करा कीं " प्रिय शुभा " अशा शब्दांनीं प्रारंभ करण्याऐवजीं मी " माझ्या विद्यार्थि-मित्रांनो ! " अशी शब्दांनीं सुरुवात करून मग जर लेखन केलें असतें तर माझ्या लेखनाचें स्वरूप कसें बनलें असतें ? सहज लक्षांत येण्यासारखी गोष्ट आहे कीं मग माझ्या लिहिण्यांतली सलगी, त्यांतला मोकळेपणा, त्यांतला हलकेफुलकेपणा नाहींसा झाला असता. त्यांत औपचारिकपणा आला असता,

जडपणा आला असता; कदाचित् रुक्षपणाहि आला असता. आपल्या घरच्या माणसाशीं बोलत असतांना आपण खुशाल ह्या मुद्यावरून त्या मुद्यावर उडी मारतों. मागें पुढें हवें तसें सरकतों, पलटे खातों; तसें परक्यांशीं बोलतांना अथवा सभेंत बोलतांना करतों का आपण? तेथें आपणाला तर्कयुक्त व प्रौढपणानें बोलावें लागतें. हा जो घरगुती बोलण्यांतला आणि परक्यांशीं किंवा सभास्थानीं बोलण्यांतला फरक तोच पत्र-लेखन व निबंध-लेखन यांमधील फरक. जो स्वैरपणा किंवा बोलघेवडेपणा निबंधादिक गंभीर लेखनप्रकारांना मुळींच खपणार नाहीं, तो पत्रप्रकारांत केला तरी चालतो; इतकेंच नव्हे तर तो उपकारक ठरतो. पत्रें म्हणजे आपल्या जिवाभावाच्या व्यक्तीबरोबर केलेल्या मन-मोकळ्या गुजगोष्टी. कागदावरचा विश्रब्धालाप. हा ज्यांना साधत नाहीं अथवा ज्यांच्या प्रकृतींतच तो नाहीं त्यांना पत्रलेखन कधींच जमावयाचें नाहीं.

बोलघेवडेपणा अथवा मनमोकळेपणा म्हणजे पाचकळ चव्हाट असा अर्थ मात्र कृपा करून तुम्ही कोणी करूं नका. मनमोकळ्या पत्रांत काय अथवा बोलण्यांत काय, वाचणाऱ्याला अथवा ऐकणाऱ्याला गोडी तर वाटलीच पाहिजे. तुमच्या ओळखीचे एखादे तरी आजोबा अथवा आजीबाई अशा असतील कीं ज्यांचें बोलणें ऐकत राहावेसें वाटतें. त्यांत गाढी विद्वत्ता किंवा बिनतोड युक्तिवाद असतो असें नाहीं; पण त्यांत गंमत असते, चुटके असतात, चिमटे असतात, सांगण्याची लक्ष वेधून घेणारी ढब असते. थोडक्यांत म्हणजे त्यांच्या बोलण्यांत चव असते, रस असतो, चतुरस्रपणा असतो. ही चव किंवा रस बिघडूं न देणें हें पत्रलेखनाचें माझ्या मतें मुख्य कसब आहे. म्हणून पत्रलेखक

विद्वान् नसला तरी चालेल, पण तो चतुरस्र असायलाच हवा. नाहीं तर त्याचें लेखन अळणी होईल.

दुसरी गोष्ट अशी कीं आपल्या भोंवतालचें नानाविध रूपांनीं नटलेलें जें जग त्याच्या विषयीं पत्रलेखकाच्या मनांत प्रेम हवें, खरें-खुरें प्रेम हवें. पत्रलेखकच जर मनानें उबलेला नि विटलेला असेल तर त्याच्या लेखनाची भट्टी करपून तरी जाणार किंवा आंबून तरी जाणार. पण एवढ्यानेंहि भागणार नाहीं. ज्याला आपण लिहितों त्याच्याविषयीं सुद्धां लेखकाच्या मनांत प्रेमभावना हवी, जिव्हाळा हवा. नाहींपेक्षां पत्राचा विस्तारच होणार नाहीं, तें फुलणार नाहीं, खुलणार नाहीं.

हें लिहीत असतां मला एक आठवण झाली. मी १९३२ ते ३४ दोन वर्षे नाशिकच्या तुरुंगांत होतों. माझे बाहेर अनेक मित्र होते. मला सारखें वाटे कीं त्यांच्यापैकीं कोणाना कोणाचें तरी पत्र यावें. पण एकजण लिहील तर शपथ. शेवटीं मीच बाहेर निरोप पाठविला कीं, "अरे, कोणी तरी मला लिहा. कांहींहि लिहा ! पण लिहा !" महिन्याभरानें एका दोस्ताचें पत्र आलें तें पुढीलप्रमाणें होतें:—

मित्रवर्य श्री. नारायण गणेश गोरे यांसी,

साष्टांग नमस्कार विनंति विशेष.

आपला निरोप पोहोंचला. आपल्या भेटीचा योग केव्हां येईल तेव्हां खरा. आम्ही बाहेरील सर्व मंडळी सुखरूप आहों. आपण आपल्या प्रकृतीस जपावें. काय बहुत लिहिणें ? क० लो० हे वि.

आपला

क्ष

हें जेमतेम चार ओळींचें पत्र वाचल्यावर अगदीं मुस्कटांत मारल्या-सारखा मी गप्प झालों. कोठून बाहेर निरोप पाठविण्याची आपणाला बुद्धि झाली असें मला वाटलें. त्या पत्रांतला तो सव्वा हात लांबीचा मायना केवळ पत्राची लांबी वाढविण्यासाठीं होता हें उघडच दिसत होतें. मला उद्देशून लिहलेलें ते " आपला निरोप, " " आपली भेट, " " आपली प्रकृति " वगैरे शब्द वाचून मी तर चकितच झालों. मी का पत्रलेखकाला अपरिचित होतों ? कीं मी त्याच्याहून पांच-पंचवीस वर्षांनीं मोठा होतों ? पत्रलेखक बापू व मी तर लंगोटीयार मित्र. त्यानें असले औपचारिक शब्द वापरावे याचा अर्थच मला कळेना. आणि शेवटीं " बहुत काय लिहिणें ? " असा प्रश्न करून तर कमालच केली होती त्यानें. पत्रांत अगोदर कांहीं लिहिलें असलें तर बहुत काय लिहिणें या शब्दांना कांहीं अर्थ. पण मुळांत जेथें कांहीं मजकूरच नाहीं, अशा पत्रांत " बहुत काय लिहिणें " हें शेपूट मायन्यासारखेंच निवळ जागा भरून काढण्यासाठीं वापरलेलें असतें ! मी तुरुंगांत होतों तेव्हां बाहेरचें जग कांहीं माझी वाट पाहात थांबून राहिलेलें नव्हतें. खुद्द बापूचें लग्न झालें होतें आणि त्याला मोठी नोकरी मिळाली होती. आमचा दुसरा एक मित्र परदेशांत उच्च शिक्षणासाठीं गेला होता. कोणाची तरी एक उत्तम कादंबरी प्रसिद्ध झाली होती आणि आमच्या कॉलेजांत कसला तरी एक टोलेजंग समारंभ नुकताच उरकला होता. अशा एक ना दोन शेंकडों घटना घडल्या होत्या, घडत होत्या. पण आमचा बापू तें चार ओळींचें पत्र भरून काढतां काढतांच टेकीस आला !

तुम्ही पाहिलेंत तर बहुतेक लोकांचीं पत्रें याच मासल्याचीं असतात. असें कां व्हावें ? याचीं कारणें उघड आहेत. पत्रलेखकाला

जीवनाच्या विविध अंगांबद्दल गोडी नसते हें एक कारण आणि आपले विचार कागदावर उमटविण्यासाठीं ज्या भाषेचें साहाय्य लागतें ती भाषाच त्याच्यापाशीं नसते, हें दुसरें कारण. म्हणजे बहुतेक पत्रलेखक अंधळे आणि थोटे असतात. ह्या अर्थानें कीं जें घडतें तें पाहण्याची त्यांच्या ठिकाणीं दृष्टि नसते आणि पाहिलेलें लेखणींतून उतरविण्याचें कसबहि त्यांच्या हातांत नसते. यशस्वी पत्रलेखक होण्यासाठीं चौफेर फिरणारी रसिक दृष्टि आणि दृष्टीनें जें टिपलें तें शब्दांतून व्यक्त करणारी संपन्न लेखणी यांची आवश्यकता आहे.

हे गुण सगळयांना सारख्याच प्रमाणांत हस्तगत करून घेतां येतील असें नाहीं. कोणाला कमी यश येईल तर कोणाला अधिक. पण पत्र-लेखनाची म्हणून कांहीं एक उपजत अशी देणगी असते· असें मात्र निश्चितच नाहीं.प्रयत्नानें प्रत्येकाला पुष्कळ प्रगति करतां येण्याजोगी आहे. मी ज्याच्या पत्राचा वर उल्लेख केला तो माझा मित्र बापू स्वभावानें कांहीं माणूसघाण्या, तुसडा अथवा घुम्या नाहीं. बोलायला चालायला चांगला अघळपघळ आहे. पण पत्र लिहायला हातांत लेखणी धरली कीं त्याचें मन संकोचतें. त्याचा मनमोकळेपणा गारठून आणि गोठून जातो जसा कांहीं ! कांहीं व्यक्तींना लेखणीची जी ही धास्ती असते ती गेली पाहिजे. ती गेली कीं मग आपले विचार लेखणीमधून झराझर वाहूं लागतील, कागदावर उतरूं लागतील.

असो. मुद्यावरून मुद्दा निघतां निघतां मी पत्रें आणि तीं कशीं लिहावीं ह्या विषयाच्या ऐन चर्चेंतच शिरलों.पण आतां आणखी खोलांत शिरत नाहीं. आणि कोणत्याहि प्रकारचें लेखन हें करा नि तें टाळा असें शिकवून शिकवतांहि येणार नाहीं. तें प्रत्यक्ष केलें पाहिजे, म्हणजे अनुभवानें येऊं लागतें. शेवटीं अनुभव हाच खरा शिक्षक.

मी वर म्हटल्याप्रमाणें शुभाच्या निमित्तानें मी हीं द्रोणभर करवंदें गोळा केलीं. मुंबईपासून मणिपुर–रंगून येथपर्यंतच्या प्रदेशांतून तीं वेचून आणलेलीं आहेत. आतां तोच द्रोण मी महाराष्ट्रांतील तुम्हां विद्यार्थी व विद्यार्थिनींसमोर ठेवीत आहे. माझ्या मतें मी करवंदें चांगलीं टपोर आणि पिकीं अशीं पाहून मगच द्रोण भरला आहे. आतां तीं चवीला कितपत उतरतात तें ठरवण्याचें काम तुमचें !

२४।१२।५३
देशमुखवाडी, पुणें २

**नारायण गणेश गोरे**

---

# १ : जमिनीवरून अस्मानांत

**प्रिय शुभा,**

काल मी निघालों तेव्हां तुझा निरोप घेतां आला नाहीं. कारण मी घरून निघालों तेव्हां तूं गाढ झोपली होतीस; म्हणून झोपेंतून तुला जागें करावें असें मला वाटेना. या खेपेला मी तीन–चार दिवस पुण्यास राहिलों पण सारा वेळ घाईगर्दींतच गेला! तूं म्हणशील " या खेपेपुरतेंच का आहे हें ? तुमची सदाचीच आहे घाई नि गर्दी ! आमच्याकडे बघायला तुम्हांला फुरसत असते कधीं ? " खरें आहे तुझें म्हणणें. पण मी तरी काय करूं ? सुमतीबरोबर, तुझ्याबरोबर, आई व अण्णांच्याबरोबर अधिक वेळ घालवला पाहिजे हें कळतें मला, त्याची जाणीव आहे माझ्या मनाला. पण–! "

त्यामुळें मी गाडींत बसलों तेव्हां मनाला कोठेंतरी कांहीं तरी बोंचत, खुपत होतें.

गाडींत मोठ्या मुष्किलीनेंच जागा मिळाली. पुण्यामुंबईच्या दरम्यान बहुतकरून कोणी ना कोणी तरी ओळखीचें भेटतेंच. तसेंच

याहि वेळेस झालें आणि एका भल्या गृहस्थानें आपल्या आसनांतलें अर्धें आसन मला देऊं केलें ! स्वभावतः मला गर्दीचा भारी तिट्कारा आहे. प्रसंगविशेषीं भरणाऱ्या मोठमोठ्या सभा, मिरवणुकी, यात्रा मला आवडतात पण मुंबईसारख्या शहरीं अष्टौप्रहर जी गर्दी व गडबड चालू असते तिनें माझा जीव अगदीं उबगून जातो. मुंबईत तुम्ही रस्त्यावर जा, ट्राममध्यें बसा, स्टेशनाच्या फलाटावर उभे असा नाहीं तर गाडींत चढा, माणसें तुम्हांला वेढून टाकतात जशीं कांहीं. आणि माणसें तरी कसलीं ? बिड्या पिणारीं, पचकन् थुंकणारीं ! अस्सा राग येतो. गर्दी, खेचाखेच, शिरा ताणून बोलणें, थुंकणें, गैदीपणा हे प्रकार माझ्या स्वभावाला परवडत नाहींत अगदीं सुद्धां आणि आमच्या गाडींत तर अशी कांहीं गर्दी होती म्हणतेस ! जरा इकडचें तोंड तिकडे वळवलें कीं शेजाऱ्याच्या कानाला लागत होतें !

त्यांतल्या त्यांत सध्यां एवढें बरें आहे कीं गाडीच्या आंत जरी डोळे मिटून बसावें असें वाटत असलें तरी बाहेर मात्र डोळे निववील असा देखावा दिसत असतो. आपल्या ह्या देशांत पावसाळ्याचें केवढें महत्त्व प्राचीन काळापासून मानलेलें आहे, नाहीं ! किती त्याच्यावर कवनें, किती कथा, आणि किती सण ! देशाचें जीवितच सारें पावसावर अवलंबून, तेव्हां पावसाचें एवढें कोडकौतुक व्हावें हें साहजिकच आहे. मृगनक्षत्राच्या सुमारास वर काळेभोर ढग जमूं लागले कीं मुलें म्हणणार "ये रे ये रे पावसा, तुला देतो पैसा." आपल्याकडच्या ऋषिमुनींनींहि त्याला आळविलें आहे कीं "हे देवाधिदेवा इंद्रा ! आम्ही यज्ञांत तुला हविर्भाग देतों ! तूंहि कृपाळूपणें आमच्या भूमीवर जलधारांचा अभिषेक कर !"

शुभा, पावसाच्या पाण्यांत तरी काय अजब किमया आहे पाहा! त्याला स्वत:ला रंग नाहीं पण तें डोंगरावर शेतावर पडलें कीं सारें कसें हिरवें हिरवें होऊन जातें! सारें कसें मऊ मऊ लुसलुशीत दिसूं लागतें! झोंपलेलें जागें होतें, वाळलेलें फुटूं लागतें आणि मेलेलें जिवंत होतें! मला मोठी गंमत वाटते ह्या हिरव्या सृष्टीकडे पाहून. सगळीकडे एकच रंग, हिरवा रंग. पण खरोखरी हा एकच रंग असतो का? नाहीं. हिरव्यांत सुद्धां नाना प्रकार दिसून येतात. गडद हिरवा, काळपट हिरवा, निळा हिरवा, सोनेरी हिरवा, पोपटी हिरवा, फिका हिरवा. कांठावरच्या झाडझाडोऱ्याचें प्रतिबिंब ओढ्याच्या पाण्यांत पडल्यामुळें ओढ्याचें पाणी सुद्धां हिरवें भासतें. अशी ही सगळीकडे पसरलेली पाचूची आरास पाहून मन शांत झाल्यावांचून कसें राहील?

या हिरव्या भूमीच्या पोटांतून आणखी महिन्या दोन महिन्यांनीं सोन्यासारखें धान्य उत्पन्न होईल, आणि सारें आनंदून जाईल! आपल्याकडे गरोदर बायकांना हिरवें लुगडें, हिरव्या बांगडया घालण्याची चाल आहे; ती पृथ्वीच्या या रूपाकडे पाहूनच सुचली कीं काय कोण जाणे?

पण ही मजा कल्याणपर्यंतच, फार तर ठाण्यापर्यंत. ठाणें मागें पडलें कीं रुळांचा खडखडाट, धूर ओकणाऱ्या गिरण्या, मुंबईच्या आसपासची घाण व माणसांची धांवपळ झाली सुरू. हां हां म्हणतां कुर्ला आलें नि गेलें सुद्धां. मग शीव, मग माटुंगा आणि हें आलें दादर. "हमाल, हमाल" करीत दारांतून, खिडकींतून, भराभर तांबडे डगलेवाले चढले गाडींत. मी मनांत म्हणालों, "चला, आवरा सामान नि उतरा खालीं चपळाईनें, नाहीं तर भायखळ्यावर पोंचायचे आपण."

दादरला उतरलों आणि सरळ बैठकीच्या जागीं गेलों. तेथलें काम आटोपून परतेपर्यंत रात्रीं अकराचा सुमार झाला ! पहाटे ५॥ वाजतां उठणें भागच होतें. म्हणून शरीर कुरकुरत होतें तरी उठलें तसाच. प्रातर्विधि उरकला आणि विमान कंपनीच्या मोटरीनें जुहूच्या विमानतळावर येऊन दाखल झालों. जुहूचा विमानतळ खूप विस्तीर्ण आहे. समुद्रकिनाऱ्याजवळ एक प्रशस्त मैदान तयार करून हा तळ उभारण्यांत आलेला आहे. जमिनीवरून आकाशांत उड्डाण करतांना आणि आकाशांतून खालीं जमिनीवर उतरतांना विमानाला खूप मोकळी जागा लागते. पक्षी जसा बसल्या जागेवरून एकदम आकाशांत झेप घेतो किंवा टपकन् जमिनीला पाय लावतो, त्याप्रमाणें विमानाला करतां येत नाहीं. चांगलें फर्लांग दीड फर्लांगपर्यंत भरवेगानें जमिनीवरून मोटरीप्रमाणेंच धांवत गेल्यानंतर विमान हळूच आपलीं चाकें अंगांत ओढून घेतें व वर चढूं लागतें. जसें चढतांना तसेंच पुन्हा उतरतांना जमिनीला पुढचीं चाकें टेकल्यानंतर बऱ्याच दूरपर्यंत धांवत जाऊन मगच विमान थांबतें. त्यामुळें विमानतळ लांब व रुंद असावा लागतो. त्यांत झाडेंझुडपें अथवा खड्डेखुड्डे असून चालत नाहींत. सकाळीं ७॥ च्या सुमारास मी विमानतळावर पोंचलों तेव्हां तेथें कितीतरी लहानमोठीं विमानें उभीं होती. राणीच्या बागेंतले बगळ्या करकोच्याच्या जातीचे पक्षी गप्प उभे राहिले म्हणजे कसे दिसतात ? तशींच ही विमानें दिसत होतीं. कांहीं लांबच लांब पंख असलेलीं चार चार पंख्यांचीं तर कांहीं एकाच पंख्याचीं चिमुकलीं. दिल्ली, कलकत्ता, कराची इकडे जाणाऱ्या मोठ्या विमानांचा आकार, त्यांचे प्रचंड पंख, त्यांचे अल्युमिनियमचे चकचकीत देह आणि त्यावर

तोंडापासून शेपटापर्यंत काढलेले तांबडे पट्टे हें सगळेंच मला फार आवडलें. मोठीं सामर्थ्यवान् आणि डौलदार दिसतात हीं विमानें.

विमानतळावरची गंमतीची पद्धत अशी असते कीं विमानांतील उतारूंच्या सामानाचें तर वजन करतातच, पण खुद्द उतारूंचेंहि वजन करतात ! विमानांत घ्यावयाचा एकंदर बोजा अमुक इतक्या वजनांहून जास्त असतां कामा नये, असा नियम आहे, म्हणून एवढी खबरदारी घ्यावी लागते.

मागें मीं विमानांतून प्रवास केला तेव्हां एप्रिल महिना असल्यामुळें आकाश अगदीं निरभ्र होतें, समुद्र स्वच्छ होता. पण या वेळीं आकाशांत ढगांची गर्दी होती व समुद्राचा राग पूर्ण शांत झालेला नसल्यामुळें तो घुश्शांत असल्यासारखा थोडा गुरगुरत होता ! आकाश व समुद्र हीं जणूं कांहीं जुळीं भावंडें आहेत. एक शांत असलें कीं दुसरेंहि शांत असतें ! वर ढग गर्जूं लागले कीं खालीं लाटा गर्जूं लागतात आणि वरून पावसाच्या सरी कोसळूं लागल्या कीं खालीं समुद्राचें पाणी किनाऱ्यावर धडाधड धडक्या मारूं लागतें !

आमचें विमान जमीन सोडून जरा वर गेल्याबरोबर आम्हांला छोटे मोठे ढग भेटूं लागले. आणखी जरा वर चढल्यावर तर बुधवार पेठेंतल्या माणसांसारखी ढगांची ही गर्दी झाली ! लांबून वाटतें आपणाला कीं ढग म्हणजे काय नुसती वाफ ! नुसते फुसके गोळे ! पण तसें नाहीं हं ! विमानाला चांगल्या कोपरखळ्या मारीत होते ते, लोटीत—ढकलीत होते, उचलीत होते ! मी आपला खिडकींतून मजा पाहात होतों त्या धटिंगणांची. आमचें विमान आणखी वर गेलें. इतक्या उंचावर कसे त्यांचे हातपाय आमच्यापर्यंत पोंचणार ? मग

पांढऱ्या करड्या गलेलठ्ठ नि दुलदुलीत लोंकरीच्या मेंढरांचा कळप दिसतोना, तसे ते दिसूं लागले. लगबगीनें सगळे किनाऱ्याकडे निघाले होते ! त्यांची वाट पाहात बसलीं होतीं ना भाताचीं खाचरें, नारळी-पोफळींचीं आगरें ! नद्यानाले नि ओढेवहाळ !

पण हें समोरून कसलें येतें आहे धूड ? अरे बापरे ! आकाशांतला मस्त हत्तींचा तांडा कीं रानरेड्यांचा कळप ? नाहीं, हे देखील ढगच आहेत. पण खूप प्रचंड ढग, पाण्यानें तट्ट फुगलेले, भुरे काळे ढग ! त्यांच्या गर्दीतून विमानाला वाट काढली पाहिजे. ही पाहा वैमानिकानें वेगानें वर सुरकांडी मारली. तरी देखील एक दोन चांगले जबरे तडाखे मिळालेच आम्हांला. दोन-तीन वेळां विमानानें हबके खाल्ले आणि उतारूंनीं आपल्या खुर्चीचे हात घट्ट पकडले ! पण दोनच मिनिटांत आम्ही त्यांच्याहिवर गेलों आणि स्वच्छ सूर्यप्रकाशाचा झोत खिडकींतून आंत आला. मग काय मजाच मजा. खालीं समुद्राचे खवले पडलेला पृष्ठभाग, त्याच्यावर दंगल धिंगाणा करीत चाललेले ढग आणि त्यांच्याहि वर स्वच्छ उन्हाच्या सोनेरी प्रकाशांतून वेगानें मार्ग कापीत चाललेल्या आमच्या विमानाचा रुपेरी मासा !

ढगांच्या फटींतून मधूनच दूर खोलावर नद्यांचे प्रवाह दिसत, बुद्धिबळाच्या पटासारखीं शेतें दिसत, पण क्षण दोन क्षणच. पुन्हा सारें ढगांच्या पडद्याआड अदृश्य होई.

मुंबईहून भावनगर म्हणजे फक्त सवा तासाचा रस्ता ! वर्तमानपत्रें वाचलीं, जरा वेळ ढगांची दंगामस्ती पाहिली, इतक्यांत काठेवाडचा किनारा आला नि विमान खालीं उतरूं लागलें सुद्धां. आठला मुंबई सोडली नि सवा नऊला आम्ही काठेवाडच्या विमानतळावर उतरलों !

आतां परत येतांना मी आगगाडीनें येणार आहे.

तुला कावीळ होणार कीं काय अशी मला शंका वाटत होती. कावीळ आहे असें ठरलें तर डॉक्टर देतील तें औषध हयगय न करतां घे, नि लवकर बरी हो. मी पुण्यास येईन तेव्हां तूं बरी झालेली दिसली पाहिजेस, बरं का !

सुमतीची प्रकृति बरी आहे ना ? तिची असेंब्ली सुरू झालेली असणार.

तीर्थरूप आईस व अण्णांस सा. न. चि. मालतीस व मंदास आशीर्वाद.

तुझा

**नाना**

भावनगर ९-९-४८



## २ : राजधानी दिल्ली

प्रिय शुभा,

२६ तारखेला आम्ही फ्रॉंटिअर मेलनें दिल्लीस जाणार होतों, पण त्या दिवशीं तिकिटेंच मिळालीं नाहींत. म्हणून २७ तारखेला निघालों. फ्रॉंटिअर मेलला तुफान मेल असेंहि लोक म्हणतात, आणि तिला तें नांव शोभतेंहि. कारण मुंबई ते दिल्लीपर्यंत सुमारें ८५० मैलांचा प्रवास ती २४ तासांत उरकते !

आम्ही फलाटावर आलों तेव्हां गाडी सुटायला चांगला अर्धा तास अवकाश होता. पण डबा हुडकून सामान लावीपर्यंत बराच वेळ गेला. माझ्याबरोबर आलेल्या श्री. भिंग्यांशीं त्यांची नातेवाईक मंडळी कांहीं बोलत होती. इतक्यांत गाडीला एक हिसका बसला आणि आम्हीं ओळखलें कीं इंजिन लागलें.

मला अजूनहि कोळशाचें रेल्वे इंजिन पाहावेसें वाटतें. तूं म्हणशील हा काय लहान मुलासारखा छंद ! पण आहे खरा. विजेच्या इंजिना-बद्दल मला आकर्षण नाहीं वाटत, कोळशाच्या इंजिनाबद्दल वाटतें.

कारण कोळशाच्या इंजिनांत माणूसपणा असतो, अवखळपणा असतो. विजेच्या इंजिनांत तो नाहीं. तें दिसतेंच कसें गंभीर नि अबोल! गडबड नाहीं, भाकभूक नाहीं, धूर ओकणें नाहीं, वाफ सोडणें नाहीं, पळतांना किंचाळणें नाहीं, कांहीं नाहीं. कांहीं भलतींच सभ्य माणसें असतात ना ? अगदीं तसें असतें विजेचें इंजिन ! पण वाफेच्या इंजिनाची केवढी गंमत. हत्ती सोंडेंत पाणी भरून घेतो आणि मग तें घशांत घळाघळ सोडून देतो तसें या इंजिनाचें पाणी पिणें ! आपलें जळजळीत जाभाड त्यानें उघडलें कीं खोऱ्यानें कोळसा आंत फेकावा लागतो आणि तो कोळसा तें गपागपा गिळून टाकतें ! कोळसा पोटांत ओ येइस्तोंवर रिचवला कीं नाकाडावरच्या धुराडयांतून धुराचा असा कांहीं धोधाटा सुरू होतो कीं आकाश भरून जातें कीं काय असें वाटावें ! मग उजव्या हातची एक कळ दाबली कीं वाफेचा फवारा उडूं लागतो. दुसरी दाबली कीं जादा वाफेचे लोटच्या लोट निघूं लागतात. तिसरी दाबली कीं इंजिन आनंदानें किंचाळतें. आणि चौथी दाबली कीं भ—भ—भप्—भप्—भप्—भप् करीत तें उगीच हालल्या-सारखें करतें ! अशा त्याच्या चेष्टा किती वर्णाव्या ? पण वाफेचें इंजिन कांहीं केवळ गमतीजमतीच करीत नाहीं. ठिकाठिकाणच्या स्टेशनांवर गोरगरिबांच्या आयाबाया भांडींकुंडीं घेऊन येतात, त्यांना हंडा हंडा गरमागरम पाणी आपल्या पोटांतून तें काढून देतें. विजेच्या इंजिनाकडून कोणाला कधीं पाण्याचा थेंब तरी मिळाला आहे का ?

मला आठवतें कीं लहानपणीं आगगाडींत बसून आम्ही मुंबईला निघालों कीं खंडाळयाच्या घाटांतून जातांना आमच्या आगगाडीचें इंजिन पुढच्या चाकाजवळचा आपला लोखंडी हात मागें—पुढें करीत,

वळसे वळणें घेत आणि तोंडानें झुकु-झुकु-झुकु-झुकु, झुकु-झुकु झुकु-झुकु असा आवाज काढीत असें कांहीं गंमतीदार धावत असे कीं कांहीं विचारूं नको. आई म्हणे कीं "कशासाठीं पोटासाठीं, खंडाळ्याच्या घाटासाठीं ।" असें गाणें गाते आहे आगगाडी. आणि आम्हांला तें खरें वाटे. पण विजेचीं इंजिनें आलीं आणि तें खंडाळ्याच्या घाटांतलें गाणें बंद झालें! खंडाळ्याच्या घाटांत तीं पूर्वींचीं इंजिनें नसलीं तरी एम्. एस्. एम्. वर अजून बदल झालेला नाहीं. म्हणून पुणें कोल्हापूरच्या दरम्यान मी जेव्हां जेव्हां आगगाडीनें प्रवास करतों तेव्हां राजेवाडीजवळच्या घाटांतून तुरुतुरु धावत जाणाऱ्या कोळशाच्या इंजिनाकडे खिडकींतून वाकून बघत राहण्याचा मोह मला अजूनहि आवरतां येत नाहीं!

सारांश, मला आपलें वाफेचें इंजिन आवडतें. आमच्या गाडीला लावलेलें इंजिन कॅनडांतून नुकत्या आणवलेल्या नव्या इंजिनांपैकीं होतें. किती अजस्र पसरलें होतें तें. मीं पावलें घालून त्याच्या लांबीचा अंदाज केला तेव्हां तें ७०।७५ फूट भरलें! त्याच्यावर W. P. अशीं पितळेचीं इंग्रजी अक्षरें बसवलेलीं होतीं. या अक्षरांचा अर्थ काय म्हणून मीं ड्रायव्हरला विचारलें तर त्याला सांगतां येईना. हें इंजिन ताशीं नव्वद मैल सुद्धां धावूं शकतें म्हणतात. पण आपल्याकडचे रेल्वेचे रस्ते तितके मजबूत नसल्यामुळें ५० मैलांच्या आसपासच वेग ठेवावा लागतो. असलीं इंजिनें आपल्या देशांत केव्हां तयार होतील कोण जाणे?

सर्व प्रवासभर हवा स्वच्छ होती. थंडी बेताची होती. दुतर्फा शेतांतल्या गव्हाच्या लोंब्या डोलत होत्या. अधून मधून अफूचीं रंगदार

फुलें आमच्याकडे पाहून हंसत होतीं. आणि जवसाचे वाफे आपले घारे डोळे क्षणभर मिचकावून पळून जात होते. पळसाच्या फुलांच्या गर्द भगव्या कोयऱ्या सर्व रानभर पसरलेल्या होत्या. आम्ही लहानपणीं पळसाचीं फुलें पाण्यांत उकळून रंगपंचमीसाठीं रंग बनवीत असूं. आतां दुकानांत रंगाच्या आयत्या पुड्या बांधून मिळतात.

दिल्लीला गाडी अगदीं वेळेवर पोंचली. मी श्री. शंकरराव देवांच्या घरीं उतरलों होतों. तेथें मामासाहेब देवगिरीकर, भाऊसाहेब हिरे, धोत्रेजी वगैरे ओळखीची मंडळी भेटली. जेवल्यावर साडेअकरापर्यंत यथेच्छ गप्पा मारल्या नि मग जी दिली ताणून ती पहाटे शंकरराव देवांच्या प्रार्थनेमुळें जाग आली तोंपर्यंत.

त्या वेळीं झुंजूमुंजूं झालें होतें. झोपतेवेळीं पांघरायला मीं जें कांबळें घेतलें होतें तें तसेंच लपेटलें अंगाभोंवतीं आणि श्री. शंकरराव नि मामासाहेब यांच्याबरोबर निघालों फिरायला. 'न गच्छेत् ब्राह्मणत्रयम्' म्हणजे तीन ब्राह्मणांनीं एकदम जाऊं नये, कांहींतरी अशुभ घडतें अशी पूर्वीची समज आहे. पण आम्ही चांगले दोन-चार मैल हिंडून आलों; बेश गप्पाटप्पा झाल्या; राष्ट्रीय, आंतर-राष्ट्रीय चर्चा झाली, पण कांहींच अशुभ घडलें नाहीं. त्या दिवशीं आम्हां तिघांचें एकदम दर्शन झाल्यामुळें जर दुसऱ्या कोणाचें कांहीं भलेंबुरें झालें असलें तर मात्र नकळे !

श्री. शंकररावांचें बिऱ्हाड नव्या दिल्लींत आहे. नव्या दिल्लीची बांधणी व आंखणी खरोखरच बादशाही थाटाची आहे. रस्ते, पायवाटा (फूटपाथ) इतक्या प्रशस्त आहेत कीं त्यांच्यापुढें आपला जंगली महाराज

रोड खरोखरच रोड म्हणजे हडकुळा वाटतो. बाकी आम्ही पुण्याचे लोकच कल्पनादरिद्री !

शनिवारवाडयाचा दिल्ली—दरवाजा नि तट आपणाला फार प्रचंड वाटतो, नाहीं ? पण दिल्लीचा लालकिल्ला, आग्रयाचा किल्ला अशा ठिकाणचे दरवाजे नि तट पाहिलें कीं अक्कल गुंग होते. दिल्लीला राष्ट्रपतींच्या प्रासादाकडे जाणारा राजरस्ता एवढा रुंद आहे कीं तो प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय त्याची कल्पना येणार नाहीं. मधोमध वाहनासाठीं रस्ता, त्या रस्त्याच्या दोन्ही अंगांला हिरवळीचे पट्टे, मग पुष्करिणी, त्यानंतर छायावृक्ष, पुढें पायरस्ते नि पुन्हा छायावृक्ष अशी मोठी प्रशस्त मांडणी आहे. नव्या दिल्लीच्या चौकाचौकांत जागा राखून छोटेखानी बगीचे केलेले आढळतात आणि त्यांत नाना रंगांचीं नि नाना ढंगांचीं फुलें फुलवलेलीं असतात. जागोजाग फुलांचे ताटवे बहरलेले असल्यामुळें फुलें चोरण्याचा विचारहि कोणाच्या मनांत येत नाहीं. असे छोटेखानी बगीचे पुणें, नाशिक, नगर, सातारा, अशा शहरांतून केले तर तीं शहरें किती सुंदर दिसतील ? पण आम्ही एक इंच जागा दिसली कीं त्यावर पत्र्याचें खोपट उभारूं, निदानपक्षीं आळींतल्या कचऱ्याची पेटी तरी तेथें ठेवूंच ठेवूं !

शंकररावांनीं आपल्या अंगणांत मोठ्या हौसेनें दहा-पांच गुलाबांचीं कलमें लावलीं आहेत. काय सुंदर फुलें आलीं आहेत त्यांवर ! तांबडा गुलाब तर असा रसरशीत तांबडा दिसत होता कीं त्याच्या पाकळ्यांत काळसर लहर मारीत होती. शंकररावांनीं लावलेली स्वीट पीज् , नोलकोल, बटाटे, यांचीं रोपेंहि छान उगवलीं आहेत. जमीन खणणें, वाफे बनविणें, कलमें लावणें, त्यांना पाणी पाजणें आणि शेवटीं

त्यावर फळें अथवा फुलें आल्यावर तीं इतरांना अभिमानानें दाखविणें यामध्यें जो कांहीं मस्त आनंद असतो तो ज्यानें स्वतः त्याचा अनुभव घेतलेला नाहीं त्याला जन्मांत कळणार नाहीं. ' साहित्यसंगीत-कलाविहीनः। साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः ॥' असें म्हटलें आहे ना भर्तृहरीनें ? त्याला मी अशी जोड देईन की ज्यानें कसल्याहि फुलझाडांचे किंवा फळझाडांचे चारदोन रोपेसुद्धां तयार केले नाहींत तो देखील पुच्छविषाणहीन पशुच समजावा !

दिल्ली ! मोठी विचित्र नगरी आहे ही शुभा. या पंचवीस तीस कोसांच्या परिघांत हिंदुस्थानाच्या इतिहासाचीं गेलीं पांच हजार वर्षें सामावलेलीं आहेत. सत्यप्रतिज्ञ राजा युधिष्ठिराच्या ओस पडलेल्या इंद्रप्रस्थापासून सत्यप्रतिज्ञ महात्मा गांधींच्या स्मशानभूमीपर्यंतचे इतिहासाचे सारे साक्षी या दिल्लीच्या पंचक्रोशींत खडे आहेत. आणि कृष्णाची लाडकी ती कालिंदी, यमुना ? गंगेची ती धाकटी बहीण असली तरी गंगेपेक्षां यमुनेनेंच अधिक साहिलें आहे, अधिक भोगलें आहे असें मला वाटतें. येथून यमुना कांहीं फार दूर नाहीं. हिच्याच तीरावर कृष्ण व बलराम आपल्या गोपामित्रांच्या समवेत असे रंग खेळले कीं त्यांचीं गाणीं हिंदुस्थानांत अजून आपण गात आहों. हिच्याच वाळवंटावर त्या प्रेमळ पण बोबडकांद्या पेंद्यानें लटक्या रुसव्यानें कृष्णाला बजावलें होतें कीं,

" किश्ना, थंबाल रे, थंबाल अपुल्या गाई
आमि घरांस जातों भाई ।"

पुढें बाळकृष्णाचा भगवान् कृष्ण झाल्यावर त्याच्या मुखांतून प्रकट-लेली गीता जशी ह्या यमुनेनें ऐकली तसेंच कौरवपांडवांच्या अठरा

अक्षौहिणी सैन्याचे मरणकाळचे चीत्कारहि तिला ऐकावे लागले. जनमेजयाच्या अहोरात्र धगधगणाऱ्या यज्ञकुंडांत हजारों लाखों सर्प फेकले जात असतानांचें भयानक दृश्य तिनें पाहिलें आणि सम्राट हर्षवर्धनानें सगळें राज्य विश्वाजीत यज्ञांत दान करून टाकल्यावर आपली बहीण जी राज्यश्री तिच्याकडून नेसायला धोतर आणि पांघरायला उपरणें तो मागून घेत आहे असा रोमांचकारी प्रसंगहि तिला पाहावयास मिळाला. पृथ्वीराज संयोगितेचें राज्य संपून दिल्लीला गुलाम वंशाचा अमल सुरू झाला तेव्हां हिनें दुःखानें सुस्कारा सोडला असेल. तैमूरलंगानें दिल्लींत पंधरा वर्षांवरच्या सर्व पुरुषांची कत्तल केली तेव्हां,

"कर श्रवाणिं ठेविते नुघडि नेत्र घे भीतिला
म्हणे अगइ ऐकलेंहि न कधीं असें पाप गा !"

अशी तिची अवस्था झाली असेल. आग्रयाजवळ शहाजहाननें ज्या त्रैलोक्यसुंदर ताजमहालाची रचना आपल्या दिवंगत राणीसाठीं केली ती यमुनेला इतकी आवडली कीं तिचें चित्र तेव्हांपासून आपल्या हृदयाशीं तिनें धरून ठेवलें आहे. पुढें भाऊसाहेब पेशव्यांनीं दिवाणीखासमधलें रुप्याचें छत फोडलें तेव्हां हिची छाती धडधडली असेल आणि महापराक्रमी महादजी शिंद्यांचीं घोडेदळें दिल्लींत वरचेवर येऊं जाऊं लागलीं तेव्हां त्यांची तृषा हिनेंच शांत केली असेल. इंग्रजांचा बावटा लालकिल्ल्यावर फडकला तेव्हां आपलें नष्टचर्य केव्हांच संपणार नाहीं कां असें तिला वाटलें असेल आणि तो बावटा खालीं जाऊन अशोक-चक्रांकित ध्वज तिथें फडफडूं लागलेला पाहून तिच्या अन्तःकरणांत आनंदलहरी उचंबळल्या असतील. पण हा आनंद जरा कोठें टिकतो न टिकतो तोंच नथूरामाच्या पिस्तुलाचे बार आणि महात्मा गांधीजींचे

"हे राम" हे शब्द वज्रघातासारखे तिच्या कानावर पडून दुःखानें ती बावरी बनली असेल !

गांधीजींची चिता जेथें रचली त्या राजघाटापासून राजेंद्रबाबूंच्या प्रासादापर्यंतचीं दृश्यें माझ्या डोळ्यांसमोर जेव्हां उभीं राहिलीं तेव्हां मनांत केवढी विलक्षण कालवाकालव झाली माझ्या ! मीं म्हटलें किती विलक्षण नगरी आहे ही ! अमरवेल ज्याप्रमाणें एकीकडे सुकत असते आणि दुसरीकडे पालवत असते, तशी ही दिल्ली एकीकडे अखंड वठत आहे, तर दुसरीकडे अखंड फुटत आहे ! तिच्या डोळ्यांत आसूं आहे तर ओठावर हसूं आहे !

दुसऱ्या दिवशीं मी कोटागृहांत सौ. ताराबाई कुलकर्ण्यांच्याकडे गेलों. त्यांची मुलगी पद्मजा म्हणजे अशी चिमखडी पोर आहे म्हणतेस. मराठी, हिंदी, चुरचुर बोलत होती. पायांत चुस्त पायजमा घालून नि पाठीवर दोन शेपटे सोडून तुरतुर चालत होती ! कोटा-गृहांत पंजाबी आहेत, महाराष्ट्रीय आहेत, नाना प्रांतांतलीं मुलें आहेत. कोणी हरनामसिंग तर कोणी प्रभुदयाळ, कोणी पांडे तर कोणी सिना. कोणी बरुआ तर कोणी मेहता. कोणी गोखले तर कोणी अय्यंगार. सारीं एकाच आवारांत राहतात, एकाच शाळेंत जातात, एकाच हिरवळीवर खेळतात. परस्परांच्या नित्य-सहवासामुळें हीं मुलें द्विभाषी त्रिभाषी बनत आहेत. काकासाहेब गाडगिळांची लहानगी तिलोत्तमा देखील हिंदींतून फाडफाड बोलत असते. आपल्या देशांत फार भेद, अनेक कोंडाळीं, असंख्य डबकीं; आणि प्रत्येकाला आपल्या डबक्याचा भयंकर अभिमान. नवा भारतदेश तयार व्हावयाचा असेल तर हीं डबकीं सोडून एका मोठ्या सागरांत पोहावयाला आपण तयार

असलें पाहिजे. मी तर म्हणेन कीं नाना राष्ट्रांतील हजारों लाखों मुलें एकत्र वाढलीं पाहिजेत. पण तें केव्हां होईल तेव्हां होईल.

येतांना रेवा येथें सोशॅलिस्ट पार्टीच्या बैठकीसाठीं गेलों होतों. रेवाला जाण्यासाठीं सतना स्टेशनवर उतरून पुढें ३२ मैल मोटारीनें जावें लागतें. पण ते ३२ मैल केव्हां संपले तें कळलें नाहीं मला. या ३२ मैल लांबीच्या रस्त्यावर दुतर्फा आंब्याचीं झाडें लावलेलीं आहेत. हीं हजारों आंब्याचीं झाडें मोहरानें नुसतीं लढलीं होतीं. चारदोन तरी मोहराचे तुरे नाहींत असें झाडच यंदा आढळणें कठिण झालें आहे. चैत्रगौरी सुरू झाल्या कीं तुम्ही बायका कशा एकजात नटतां ना? अगदीं तसेच नटलेले होते हे आम्रवृक्ष. आमची मोटार सुसाट मार्ग कापीत होती. सारी हवा मोहराच्या घमघमाटानें भारावली होती आणि चतुदर्शीच्या चंद्राचें नवथर चांदणें क्वचित् रेंगाळलेल्या संधिप्रकाशांत मिसळल्यामुळें आजूबाजूच्या प्रदेशावर एक अद्‌भुत रंग व अद्‌भुत आनंद पसरलेला होता. मला वाटलें कीं मी रेवाला जात नसून कोठल्या तरी जादूच्या नगरीकडेच चाललों आहें!

तुझा,

**नाना**

रेवा ता. २-३-५०

## ३ : बालवाडीचा माळी

**प्रिय शुभा,**

उद्यां डिसेंबरची २४ तारीख. उद्यां साने गुरुजींची जन्मतिथि महाराष्ट्रांत ठिकाठिकाणीं साजरी होईल. त्या निमित्तानें साधनेचा खास अंकहि निघणार आहे आणि त्या अंकासाठीं मीं कांहींतरी लिहावें अशी सूचना देणारें वसंतराव बापटांचें पत्रहि आलें आहे. पण मी आहें तुरुंगांत. तेव्हां येथें लेख लिहिला तरी तो त्यांना पोंचणार कसा ? मात्र तुरुंगांत असल्यामुळेंच कीं काय गुरुजींची आठवण मला अधिक तीव्रतेनें होत आहे ! १९४५ सालीं गुरुजींचा वाढदिवस आम्हीं नाशिक तुरुंगांत साजरा केला होता. २४ डिसेंबर ही येशूच्या जन्माची तिथि ! त्या तिथीला जन्म घेणारीं माणसें आईच्या अंतःकरणाचींच निपजावीं असा निसर्गसंकेत आहे कीं काय कोण जाणे ?

त्यानंतर आठवड्याभरांतच गुरुजी सुटले. तुरुंगांतून ते मुंबईला जाण्यासाठीं म्हणून स्टेशनवर गेले, पण तेथून नाशिक रोडच्या व नाशिक

शहराच्या विद्यार्थ्यांनीं त्यांची जवळ जवळ मिरवणूकच काढली ! योगायोग असा कीं त्याच दिवशीं सुमति व तूं मला भेटण्यासाठीं नाशिकला आला होतात आणि स्टेशनवरच तुमची व गुरुजींची गांठ पडली होती ! आठवतें तुला ? लहान मुलांचीं मनें, अनपढ अशा सामान्यजनांचीं मुलांसारखीं मनें आपल्याकडे खेचून घेणारा गुरुजीं-च्यासारखा लेखक महाराष्ट्रांत दुसरा झाला नाहीं. बहुधा इतर प्रांतांतहि झालेला नाहीं. मला आठवतें कीं एका दिवशीं नाशिक तुरुंगांतले एक अधिकारी दोन मुलींना घेऊन आमच्या यार्डांत आले. दोन मिनिटेंच त्यानें गुरुजींची व त्या मुलींची भेट करविली आणि तो निघून गेला. दुसऱ्या दिवशीं त्यानें सांगितलें कीं " त्या दोन मुली म्हणजे मुंबईहून त्याच्याकडे सुटीसाठीं म्हणून आलेल्या त्याच्या दोन भाच्या कीं पुतण्या होत्या. त्यांना जेव्हां कळलें कीं गुरुजी याच तुरुंगांत आहेत तेव्हां त्यांना पाहिल्यावांचून आपण मुंबईला परत जाणार नाहीं असा त्यांनीं हट्टच घेतला. कांहीं केल्या ऐकेनात. तेव्हां त्यांना घेऊन आलों गुपचूप ! " त्यांना तुरुंगात घेऊन येण्यांत त्या अधिकाऱ्यानें अधिकारातिक्रमणच केलें होतें. कारण तुरुंगांतील कैद्यांच्या बराकींत मुलांना आणावयाचें नसतें. पण मुलींच्या हट्टापुढें नाइलाज होऊन त्यानें त्यांना गुरुजींची भेट घडविली होती.

गुरुजींच्याबद्दल मुलांमुलींना वाटणाऱ्या या विलक्षण आकर्षणाच्या गोष्टी एक दोन नाहींत. पण या अपूर्व आकर्षणाचें कारण कांहीं गूढ होतें असें मात्र मला वाटत नाहीं. कोंकणांत मीं पाहिलें आहे कीं आमच्या काकूची नुसती "ये गोऽ येऽऽ" अशी मायेनें मारलेली हांक ऐकली कीं उधळलेलीं ओढाळ जनावरें मुकाटपणें

गोठ्याकडे परत येतात. तिची थाप पाठीवर पडली कीं खुशावतात, फुरफुरतात आणि दाव्यासाठीं मान पुढें करतात. या आकर्षणाचें जें रहस्य आहे तेंच गुरुजींविषयीं बालसृष्टीला वाटणाऱ्या आकर्षणांत आहे. आणि तें रहस्य म्हणजे दुसऱ्याच्या अन्तःकरणाची संपूर्णपणें उमज आणि त्याच्या भावनांविषयीं निरपवाद सहानुभूति. पालघरजवळ श्री. सखारामपंत पाटील म्हणून एक वृद्ध शेतकरी आहेत. आतां अगदीं पिकलें पान झाले असतील ते. त्यांच्या वाडीवर मी एकदां गेलों होतों. तेथील मिरच्या, टॉमटो, वांगीं इत्यादींचीं रोपें आणि चिकूचीं कलमें मीं पाहिलीं आणि मुग्ध होऊन गेलों. सखारामपंतांना मीं विचारलें "इतरांच्या वाडींत अशीं रसरसलेलीं झाडें कां दिसत नाहींत? शेतीमध्यें तुम्हांलाच हें यश कसें लाभलें? तुमच्यासारखें यश इतरांना लाभेल काय?" तेव्हां ते म्हणाले, 'न लाभायला काय झालं? ज्या शेतकऱ्यांशीं झाडं बोलूं लागतील तो यशस्वी झालाच पाहिजे!' जशीं सखारामपंतांशीं झाडें बोलतात, आमच्या काकूंशीं गुरेंढोरें बोलतात, अगदीं तशींच गुरुजींशीं मुलें बोलत असत. कारण? कारण त्यांना या व्यक्तीसंबंधीं वाटणारा विश्वास, निर्विकल्प विश्वास! सखारामपंतांच्या दृष्टींतून, आमच्या काकूच्या आवाजांतून अथवा गुरुजींच्या हसण्यांतून तो व्यक्त होत असतो. आणि तो समजायचे ते समजतातहि. आजीनें तुला स्वयंपाकघरांतून "शुभा येगऽऽ" म्हणून हांक मारली कीं त्या हांकेच्या ढंगावरून तूं लगेच सांगतेसच कीं नाहीं कीं "आजी कांहींतरी खायला बोलावत्ये आहे?" हें ज्ञान तुला कसें होतें? गुरांढोरांना आणि झाडापेडांना तसेंच ज्ञान होतें. त्यांना प्रेमाचा वास कळतो, प्रेमाचा स्पर्श कळतो, प्रेमाचा बोल कळतो.

माझें हें म्हणणें कोणाला पटत नसेल तर त्यानें एखादा कसबी माळी बागेंत काम करीत असतांना त्याच्या बोटांच्या हालचालींकडे आणि त्याच्या डोळ्यांकडे लक्ष द्यावें. तो झाडांच्या मुळ्या कशा मोकळ्या करतो, झाडांची छाटणी कशी करतो, त्यांना पाणी कसें देतो आणि मग त्याच्या हातचीं झाडें कशीं न्हाऊं माखूं घालून काजळतिटी केलेल्या मुलासारखीं प्रसन्न दिसूं लागतात, तें बघावें. किंवा एखादा उमदा सतारिया गवसणींतून आपलें हत्यार बाहेर कसें काढतो, त्याच्या तारा तर्फा कशा जुळवून घेतो आणि पडद्यावरून बोटें किती मुलायमपणें फिरवतो हें ध्यानांत घ्यावें. जर सतारीसारखी भोपळ्या लाकडाची वस्तुसुद्धां वादनकाराचा स्पर्श ओळखून साळुंकी-सारखी मंजुळवाणी बोलूं लागते तर मग मुलांचें काय विचारावें ?

मुलें पुढ्यांत असलीं कीं गुरुजींच्या घोगऱ्या आवाजांत निराळीच स्निग्धता उमटत असे. त्यांचे जाड जाड बोटांचे रुंद पंजे जणूं मांजरीच्या तळव्याप्रमाणें मऊ होत आणि एरवीं त्यांची जड वाटणारी मुद्रा आंत निरांजनें तेवूं लागल्यासारखीं एकदम उजळून निघे. आणि मग मुलांना वाटे कीं आपली आई आली ! आपली आई बरें का ? कुसुमची आई किंवा प्रमोदची आई किंवा माधवची आई नव्हे—आपली सर्वांची आई !

मुलांना गुरुजी गोष्ट सांगत आहेत असा त्यांचा एक फोटो आपल्याकडे आहे. यंदा राष्ट्रसेवादलानें जें कॅलेंडर प्रसिद्ध केलें आहे, त्यांतहि तो घातलेला आहे. आतां त्या फोटोंतील गुरुजींचें हसणें आणि इतर लोकांचें हसणें सारखें वाटतें कीं निराळें तें तूं ठरव. बहुतेक सगळ्या मराठी मासिकांवर अलीकडे जीं स्त्रियांचीं तोंडें रंगवलेलीं असतात त्यांच्या हसण्याची या हसण्याशीं तुलना करून पाहा. म्हणजे

तुला हसण्या हसण्यांत कसे प्रकार असतात आणि हसण्यामधून देखील हसणाऱ्यांचें मन कसें प्रकट होतें तें समजेल. सगळींच माणसें हसतात. हसणारा प्राणी अशी मनुष्याची व्याख्याच एकानें केलेली आहे. पण हसण्या हसण्यांत केवढा फरक ? कोणाचें हसणें चटोर तर कोणाचें वेडगळ; कोणाचें छद्मी तर कोणाचें मोकळें; कोणाचें उथळ तर कोणाचें गूढ; कोणाचें आढ्यतेचें तर कोणाचें आपुलकीचें. व्यक्ति तितक्या प्रकृति नि प्रकृतिगणिक हसण्याचे प्रकार !

गुरुजींच्या तोंडावरचें हसूं हें मुलाला पोटाशीं घेऊन आनंदानें ऊर भरून आलेल्या मातेचेंच हसूं आहे. तसेंच उबदार, तसेंच निष्कपट, तसेंच सात्त्विक. गुरुजींच्या विचारांत व आचारांत, बोलण्यांत व लिहिण्यांत हा मातृभाव ओतप्रोत भरलेला होता. आणि त्या भावनेच्या द्वारांच ते सर्वांशीं मैत्री साधीत. नाशिक तुरुंगांत मला ते एकदां म्हणाले होते कीं मी मित्र जोडतों ते तुमच्यासारखा वादाविवाद करून नव्हे. माझे मार्ग निराळे. मी पटकन् जाऊन डोळे धरीन किंवा तो आजारी असला तर त्याचे पाय चेपीन. स्वयंपाकघरांत जाऊन कोशिंबीर करूं लागेन किंवा ताटेंवाट्या मांडूं लागेन. मी माणसांच्या डोक्यांत नाहीं रिघत, त्यांच्या मनांत रिघतों ! ”

महाराष्ट्रांतल्या हजारों लाखों मुलांची आईची भूक गुरुजींनीं भागवली. आपल्या समाजांत हजारों मुलें अशीं आहेत कीं ज्यांना आईच्या प्रेमाचें सुख मिळत नाहीं. कोणाला आया लाभत नाहींत, तर कांहीं आयांना प्रेमच करतां येत नाहीं. अनेक मुलांना दारिद्र्यामुळें लहानपणींच शिकण्यासाठीं अथवा पोटासाठीं घरापासून दूर जावें लागतें. अशांच्या रखरखीत जीवनांत आईची सावली देणारें कोण होतें ? गुरुजींच्या सार्वजनिक कार्याचा प्रारंभ झाला तेव्हांपासून

शेंकडों मुलें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत ओढलीं गेलीं, तुरुंगांत पडलीं, घरादारांना मुकलीं. त्यांच्यावर मायेची पांखर घालावयाला महाराष्ट्रांत होतें तरी कोण ? त्यांच्या मानसिक वाढीची काळजी वाहणारा आणि त्यांना हितोपदेश करणारा कोण होता ? त्यांना जवळ घेऊन त्यांच्या डोळ्यांतलीं टिपें पुसणारी, त्यांच्या कुडकुडणाऱ्या मनांना ऊब देणारी व पाठीवरून हात फिरवून त्यांच्या तोंडावर हसूं फुलवणारी माता होण्यांत धन्यता मानील अशी कोणती व्यक्ति होती ? गुरुजी पुढें झाले. त्यांच्या आईनें प्रेम कसें करावें त्याचा जो कित्ता गुरुजींच्या पुढें ठेवलेला होता तोच गिरवून, वाढवून, ते महाराष्ट्रांतल्या असंख्य मुलांमुलींची आई बनले.कालिदासाचें वचन आहे 'सहस्रगुणमुत्स्रष्टुं आदत्ते हि रसं रविः।' सागराचें पाणी सूर्य शोषून घेतो तें पावसाच्या रूपानें हजारपट वाढवून धरित्रीवर वर्षण्यासाठींच ! गुरुजींनीं असेंच केलें. जें आईचें प्रेम गुरुजींनीं उदंड अनुभवलें तेंच सहस्र पट वाढवून त्यांनीं महाराष्ट्रांतील मुलांमुलींना चाखवलें.

असे गुरुजी होते. कविवर्य टिळकांच्या कवितेंतील हे गोड चरण तूं वाचले आहेस ना ?

हें फूल पाहत असें उमलावयाला !
हें चंद्रबिंब चढतें उदयाचलाला;
बाहेर अंकुर निघों बघतो द्रुमाचा !
होतो विकास शिशुच्या मृदु मानसाचा.
जो होउनी आनिल हें फुलवील फूल !
सारील दूर शशिचें घनमेघजाल,
कीं अंकुरास जल तो पुरवील माळी
तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली.

आईकडून भरणपोषण करून घ्यावयाचें, बाळपणीं तिची कूस सोडावयाची नाहीं, आणि बाल्य सरून तारुण्य सुरू झालें कीं आईला विसरायचें हाहि मनुष्यस्वभावाचाच एक भाग आहे! गुरुजींच्या वाङ्मयावर लुब्ध झालेलीं, त्यावर पोसलेलीं तुझ्यासारखीं मुलें त्यांना न विसरोत म्हणजे झालें! तसें पाहिलें तर केळीला घड पडला कीं केळ सुकायला लागते. लोंगरांतील केळ्यांना पोषण देण्यासाठींच केळीचा जन्म. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांतल्या शेंकडों मुलांमुलींना विचारांचा चारा भरवून गुरुजी गेले. आपण गेल्यावर महाराष्ट्राला आपला विसर पडेल कीं काय याची खंत गुरुजींना कधींच वाटली नसेल. पण प्रसवलेल्या केळीच्या मुळांतून नव्या केळीचा विरडा फुटलेला असला म्हणजे बरें वाटतें, कारण तिची परंपरा टिकते. गुरुजींची मोकळी जागा घेणारी व्यक्ति कोणी वर येतांना नजरेस पडली असती तर हळहळ जरा कमी वाटली असती. गुरुजींप्रमाणें आईची परंपरा चालवणारी एखादी व्यक्ति महाराष्ट्रांत आजसुद्धां हवीच आहे. पण लगेच हाहि विचार मनांत येतो कीं इतर काय वाटेल ती गोष्ट मिळूं शकेल, पण दुसरी आई मिळणें किती कठीण?

पत्र फार लांबलें, नाहीं? आतां पुरें करतों. आमचा सकाळचा रोटी–डाळीचा भत्ताहि आला आहे. सगळ्यांची थाळ्या घासण्याची गडबड सुरू झाली आहे. भाकरीच्या आशेनें वरच्या निरभ्र आकाशांत मंडलें काढणाऱ्या घारी खालवर येऊन घिरट्या घालीत आहेत आणि लुबऱ्या कावळ्यांनीं कुंपणाच्या वाशावर बसून एकच कलकलाट चालवला आहे. तेव्हां पुरेच.

तुझा,

**नाना**

विसापूर तुरुंग २३-११-५०

## ४ : मुलांचीं हस्तलिखितें

प्रिय शुभा,

आज मी ××× गांवाहून येथें परतलों. गांवाचें नांव मीं मुद्दामच गाळलें आहे,कारण त्या गांवच्या नांवाचा उल्लेख करण्यांत विशेष स्वारस्य नाहीं. मी तुला आज ज्या गोष्टींबद्दल लिहिणार आहे त्यांचा आणि त्या गांवाचा कांहीं खास संबंध असता तर मीं गांवाच्या नांवाचा उल्लेख केला असता.

सोशलिस्ट पार्टीच्या कामासाठीं मी कोठेंहि गेलों तर तेथले सेवादलाचे सैनिक मला बोलावल्यावांचून राहात नाहींत. आणि सेवादल सैनिकांच्या बैठकीला गेलें कीं बहुधा एखादें तरी हस्तलिखित मासिक ते पुढें ठेवतात आणि म्हणतात कीं याच्यावर अभिप्राय द्या ! सेवादलाचेच सैनिक अशीं हस्तलिखित मासिकें चालवतात असें नाहीं, तर अनेक ठिकाणचे विद्यार्थीहि अशीं हस्तलिखित मासिकें चालवतात. तेहि अभिप्राय देण्याविषयीं असाच आग्रह करतात. मला पंचाईत पडते ती अशी कीं अभिप्राय तरी काय द्यावा. अभिप्राय

देण्यासाठीं मासिक आधीं चाळावयास तर हवें ना ? पण तें करण्यासाठींसुद्धां वेळ नसतो. आणि वेळ मिळालाच तर त्यांतलें गचाळ अक्षर, भयंकर शुद्धलेखन आणि ठराविक विषयावरच्या ठराविक कविता व लेख पाहून मन कंटाळून जातें. परंतु मुलांची भीड तर मोडवत नाहीं. मग कांहींतरी गोलमोल, त्यांना न बोचेल असा, त्यांना निरुत्साही न बनवील असा अभिप्राय खरडून मोकळें व्हावें लागतें. पण काल जेव्हां × × × गांवच्या सैनिकांनीं माझ्यासमोर आपलें हस्तलिखित ठेवलें तेव्हां मीं ठरवलें कीं आपल्या मनांतले विचार त्यांना या वेळीं बोलून दाखवायचेच. मनांत धाकधुक वाटत होती कीं यांना माझे विचार कितपत रुचतील कोण जाणे. पण माझें बोलणें संपल्यावर त्यांच्यापैकीं कांहीं जणांनीं मला सांगितलें कीं आम्हांला तुमचे विचार पटले म्हणून.

तुम्हां मुलांमुलींच्या लेखनाविषयीं माझी मुख्य तक्रार ही आहे कीं तुमचें अक्षर अगदीं गचाळ होत चाललें आहे. लहानपणीं घरचीं माणसें व शाळेंतले गुरुजी आम्ही वळणदार अक्षर काढावें म्हणून आमच्याकडून कित्ते गिरवून घेत. अक्षर गिरावितांना मांड्या, मान व बोटें अवघडल्यासारखीं होत परंतु आमच्या अक्षराला वळण येऊं लागलें कीं मनाला किती आनंद होई म्हणून सांगूं ? सुंदर अक्षर म्हणजे लेखनाचा एक अलंकार आहे. सुंदर अक्षर काढण्याची सवय लागली म्हणजे त्या मुलाच्या किंवा मुलीच्या स्वभावावरसुद्धां परिणाम झाल्यावांचून राहात नसावा अशी माझी कल्पना आहे. स्वच्छ, दाणेदार, मोकळें अक्षर काढण्याची ज्याला संवय लागलेली असेल तो चिपड्या डोळ्यांचा, शेंबड्या नाकाचा अथवा घामट कपड्यांचा कधीं

दिसेल का ? ज्याला वहीवर शाईचा डाग खपत नाहीं त्याला कपड्यावरहि शाई ओघळलेली चालणार नाहीं.

अक्षराला एकदां वळण लागलें कीं तें अखेरपर्यंत बहुधा टिकून राहतें. रँग्लर परांजप्यांचा ७५ वा वाढदिवस पुण्यांत नुकताच साजरा झाल्याचें तूं वाचलें होतेंस, आठवतें ? त्या निमित्तानें त्यांनीं दिलेला संदेश कांहीं वर्तमानपत्रांनीं छापला होता. मोडीमध्यें लिहिलेल्या त्या संदेशाचें अक्षर कसें नीटस आहे तें पाहा. परांजप्यांची पगडी, त्यांचा लांब कोट, त्यांचें उपरणें आणि त्यांच्या मिशांचे आंकडे या वयांतसुद्धां जसे ठाकठीक आहेत तसेंच त्यांचें हस्ताक्षरहि आहे ! लिहिणें कसें असावें तें रामदासांनीं आपल्याला दासबोधांत सांगून ठेवलें आहे.

वाटोळें सरळें मोकळें । वोतलें मसीचें[1] काळें
कुळकुळीत वळी[2] चालिल्या ढाळें । मुक्तामाळा जैशा ॥
अक्षरमात्र तितुकें नीट । नेमस्त पैस काने नीट
आडव्या मात्रा त्याहि नीट । आर्कुळी वेलांट्या ॥
पाहिलें अक्षर जें काढिलें । ग्रंथ संपे तो पाहात गेलें ।
येका टांकेंचि लिहिलें । ऐसें वाटे ॥
अक्षराचें काळेंपण । टांकाचें ठोसरपण
तैसेंचि वळण वांकाण । सारिखेंचि ॥

स्वामी रामदास संन्यासी असले तरी कसे साक्षेपी आणि अभिरुचीचे होते तें वरील उताऱ्यावरून समजून येईल. तुझ्या वयाच्या मुलींना ते काय सांगत आहेत पाहा :

---

१. मसीचें=शाईचें २. वळी = ओळी.

ज्याचें वय आहे नूतन । त्यानें ल्याहावें जपोन
जनासी पडे मोहन । ऐसें करावें ॥

बहु बारीक तरुणपणीं । कामा नये म्हातारपणीं
मध्यस्त लिहण्याची करणी । केली पाहिजे ॥

स्वच्छ वळणदार अक्षर असणें हें तुम्हां शाळेंत जाणाऱ्या मुला-मुलींच्या दृष्टीनें तर फार फायद्याचें आहे. माझ्या एका अध्यापक मित्राकडे मी कधीं कधीं जातों. एखाद्या वेळीं जेव्हां ते प्रश्नपत्रिकांचे गठ्ठे तपाशीत बसलेले असतात तेव्हां मी आपला उगीच त्यांच्या चेहऱ्या-कडे पाहात बसतों. ठसठशीत मोकळ्या हस्ताक्षराची प्रश्नपत्रिका तपासण्यासाठीं त्यांनीं हातीं घेतली कीं त्यांच्या चेहऱ्यावर समाधान पसरतें. मग उत्तरांत चूक असली तरी एक दोन मार्क त्यांच्या हातून सढळपणानें सुटतात देखील. पण तीच गिचमिडे अक्षरांत लिहिलेली पत्रिका त्यांनीं उचलली कीं त्यांच्या कपाळावर आठ्यांचें जाळें दिसूं लागतें. त्यांना आधीं विद्यार्थ्यानें लिहलेला मजकूर समजेल तर ते मार्क देणार ना ? वाईट अक्षरामुळें चांगल्या हुषार मुलांचें नुकसान झालेलें मला ठाऊक आहे. मुलींच्याबद्दल म्हण आहे ना, "गोरी नि अर्धे गुण चोरी" म्हणून. तसेंच प्रश्नपत्रिकेच्याहि बाबतींत समजावें. प्रश्नपत्रिका सुवाच्य नि सुंदर अक्षरांत लिहिलेली असली म्हणजे पन्नास टक्के नाहीं तरी दहा टक्के तरी यश पदरांत पडलें म्हणून समजावें.

माझी दुसरी तक्रार आहे ती तुम्हां मुलांच्या शुद्धलेखनाबद्दल. हल्लीं शाळांमधून तुम्हांला शुद्ध कसें लिहावें तें सांगतच नाहींत का ग ? आपल्या मराठी भाषेचें व्याकरण बरेंच गुंतागुंतीचें आहे आणि

त्यामुळें मराठी लेखन शुद्ध प्रकारें करणें फार अवघड जातें ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. पण आपण त्याचा जेवढा बाऊ करतों तेवढें कांहीं तें कठिण नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं आपण शुद्ध लिहिण्याची फिकीरच करीत नाहीं. आपला खाक्या असा कीं मनाला येईल तसें लिहावें आणि मोकळें व्हावें. समज तूं इंग्रजी Bird हा शब्द Burd असा लिहिलास किंवा I Know च्या ऐवजीं I no असें लिहिलेंस तर तुला अडाणी म्हणून लोक हसणार नाहींत काय? पण तूं सुशीला हें विशेषनाम खुशाल सुशिला असें लिहितेस, तुझ्या ऐवजीं तूझ्या लिहितेस आणि तरीहि तुझा भाषा विषय चांगला असें तुझ्या बाई सांगतात आणि तुझ्या मैत्रिणी तुझी तारीफ करतात. मी तुझ्या बाईच्या बद्दल लिहीत नाहीं. त्या शुद्ध लिहितात कीं अशुद्ध तें मला काय माहीत? पण आपली इंदु आतां मुंबईच्या शाळेंत शिक्षिका म्हणून शिकवते आहे ना? तिचें परवां तुझ्या आईला पत्र आलें होतें. तें पाहिल्यावर मीं हताशपणानें म्हटलें सुद्धां कीं “ हिचें भाषाज्ञान हें असें नि ही मुलींना शिकवणार! नशीब त्या पोरींचें आणि नशीब त्या मराठी भाषेचें!” पण तूं किंवा इंदूचेंच कशाला? मोठमोठे लेखक सुद्धां अशा कांहीं गमतीच्या चुका करतात कीं पुसूं नको. या “चुकार” प्रवृत्तीची प्रोफेसर क्षीरसागरांनीं आपल्या बडोद्याच्या अध्यक्षीय भाषणांत चांगलीच हजेरी घेतली आहे. अशा चुका आपणांला टाळतां नाहीं का येणार? येतील, पण त्यासाठीं आपल्या मनांत भाषेविषयीं खरें प्रेम हवें. गांधीजींच्या आगाखान पॅलेसमधील जीवनाची दैनंदिनी मीं परवां वाचली. गांधीजींचे चिटणीस प्यारेलाल त्यांना म्हणाले, ‘आपली गुजराती भाषा फार

सुरेख, भावपूर्ण आणि आटोपशीर असते.' त्यावर गांधीजींनीं उत्तर दिलें, 'तें खरें आहे, पण त्याचें कारण मी भाषेचा प्रेमी आहे. मी स्वतःला मोठा विद्वान् समजत नाहीं. पण भाषेबद्दल मात्र मला सदैव जिव्हाळा वाटतो. त्यामुळें भाषेचें संगीत मला आपोआपच येतें. आणि हा जिव्हाळा केवळ गुजरातीपुरता नाहीं. इंग्रजीबद्दलहि मला तसाच जिव्हाळा आहे. भाषा बिघडविण्याचें काम माझ्या हातून व्हावयाचें नाहीं.' शुभा, भाषा अविकृत कशी राखावयाची त्याचें रहस्यच गांधीजींनीं आपणांला या शब्दांत उलगडून दाखविलेलें आहे.

आणि माझा तिसरा आक्षेप तुम्ही निवडतां त्या विषयीसंबंधींचा. तुम्हां विद्यार्थी-विद्यार्थिनींना विषयाची अडचण कां पडते ठाऊक आहे ? मोठ्या लेखकाची नक्कल करण्याची पाळी तुमच्यावर कां येते ? याचें कारण असें कीं आपल्या भोंवतालीं जें नानाविध जग पसरलेलें आहे तिकडे आपण डोळे उघडून पाहात नाहीं म्हणून. आपलें हें पुणेंच घे. ह्या पुण्यांत भरल्या पहाटे "सकाळ, काळ, लोकशक्तीऽऽ" विकणाऱ्या पोऱ्यापासून रात्रीं दुकानें बंद झाल्यावर "चणेजोरगर्रम्-"चें गाणें नाकांत गाणाऱ्या फेरीवाल्यापर्यंत शेंकडों धंदे करणारे लोक आहेत कीं नाहीं ? हडपसरापासून विठ्ठलवाडीपर्यंत नाना देखावे, नाना वृक्ष, नाना पक्षी, नाना तृणें,नाना फुलें पर्णें आहेत. वडारांच्या, वैदूंच्या, मुलतान्यांच्या, सिंध्यांच्या वस्त्या आहेत. त्यांचें वर्णन एकातरीं हस्तलिखित मासिकांत आढळते का ?

मला आठवतें कीं, दोन तीन वर्षांपूर्वीं ठाण्याच्या राष्ट्रसेवादलाच्या सैनिकांनीं ठाणें- जिल्हा-दर्शन म्हणून एक प्रदर्शन भरवलें होतें.

त्यांतल्या नवीन पणामुळें मला तें फार आवडलें. जिह्यांतील वनस्पति, माती, दगड, धान्यें, तृणें, वारल्यापासून पांढरपेशापर्यंतच्या मंडळींनीं बनवलेलें कलाकुसरीचे पदार्थ असा मांड मांडलेला होता. त्यामुळें ठाणें जिह्याचें केवढें भव्य दर्शन झालें. एका भाताचेच पांचपन्नास प्रकार ठेवले होते. पंधरावीस प्रकारचीं केळीं होतीं. असें निरीक्षण करण्यास, संग्रह करण्यास तुम्ही शिका. त्यांचीं वर्णनें करा. मग पाहा तुमचीं मासिकें एकदम किती निराळीं दिसूं लागतील तें. नाहींतर "आई" वर अथवा "कोकिळे"वर कविता, आमचे भारतर अथवा घृष्णेश्वराची सफर असले लेख; किंवा दोन टेकडयांमागून सूर्य उगवतो आहे अथवा समुद्रावर जहाज चाललें असून किनाऱ्यावर नारळीचें झाड उभें आहे असलीं चित्रें, यांनीं सजलेली ठराविक सांच्याचीं मासिकें डझनावारी आहेतच. त्यांत तुमच्या मासिकाची भर कशाला? कां उगीच कागदाची, शाईची नि वेळेची नासाडी करावयाची?

मला वाटतें आपल्या लोकांत अजून खरी जिज्ञासाच निर्माण व्हावयाची आहे. श्री. ठाकरे म्हणून एक मोठे नाणावलेले मराठी लेखक आहेत. त्यांनीं अशी एक आठवण सांगितली आहे कीं बोरघाटांतला रेल्वे रस्ता जेव्हां प्रथम बनवला तेव्हां तेथें एक इंग्रज इंजिनियर होता. तो आपल्या महार चपराशाकडून घाटांतल्या सगळ्या वनस्पति आणवी आणि फावल्या वेळांत त्यांचीं चित्रें रेखाटून त्यांच्या-बद्दलची सगळी माहिती लिहून काढी, त्यांचें वर्गीकरण करी! आपले अण्णा ज्या कचेरींत होते तेथें कार्व्हटन म्हणून एक बडा इंग्रज अधिकारी होता. त्याला आपला एक छंद. पक्ष्यांचीं मिळतील तेवढीं अंडीं जमवायचीं. पांढरीं, भुरीं, निळसर, कबरी, लांबट, गोल,

शेंकडों प्रकारचीं अंडीं त्यानें जमविलीं होतीं. पांचगणीला मी गांधीजींकडे एकदां गेलों होतों. तेथें एक म्हातारा जर्मन भूगर्भशास्त्रज्ञ भेटला. दुनियेंतलं हिमालयासकट अनेक पर्वत त्यानें धुंडाळले होते. जंगलें व वाळवंटें तुडवलीं होतीं. आम्हांला भेटला तेव्हां तो महाबळेश्वराच्या रानांत हिंडत होता.त्यानें लग्न केलें नव्हतें. त्याला आमच्यापैकीं कोणीतरी विचारलें, " कां, तुम्हीं लग्न कां केलें नाहीं ? " तेव्हां तो आपले निळे डोळे मिचकावीत म्हणाला, "मला वाघाची भीति वाटत नाहीं इतकी बायकांची वाटते, म्हणून?" दगड,धोंडे,स्फटिक हेच त्याचें संवगडी.भूगर्भशास्त्रांतील तज्ज्ञ म्हणून त्या वृद्धाची जगभर ख्याति होती. तुझ्या मामाकडे शिकारीवर व मासेमारीवर डझनावारी पुस्तकें आहेत. वाघाच्या सवयी काय, सिंहाचा माग कसा काढावा, उडत्या पाणकोंबड्यांच्या जाती कशा ओळखाव्या, मशीर मासे कोणत्या ठिकाणीं गावतात, किती किती विषयांवर त्या ग्रंथांतून लिहिलेले आहे ! पण हें सारें लिखाण कोणीं केलेलें आहे ? आपल्या हिंदी लोकांनीं ? नाहीं. युरोपियन अधिकाऱ्यांनीं आपापले उद्योगधंदे संभाळून तें केलेलें आहे बरें का ? त्यांच्या जिज्ञासेला वर्ज्य असा विषय नाहीं आणि आम्हांला चाकोरीबाहेर पडायचें ठाऊक नाहीं ! त्यामुळें आपलें लिखाण एकठशी व एकरंगी बनतें आणि कंटाळवाणें होतें. आपल्या जिज्ञासेचें क्षेत्र आपण असें आकुंचित बनवून ठेवल्याकारणानें आपले लेखनाचे विषयहि मर्यादित बनतात. तसेंच शब्दसंचयावर त्याचा परिणाम होऊन आपली भाषाहि खुरटते. पाश्चात्य भाषांच्या मानानें मराठी भाषा इतकी खुरटी वाटते त्याचें एक कारण असें कीं शेंकडों उद्योगधंद्यांत गुंतलेल्या पण मराठी बोलणाऱ्या ज्या जातिपाती महाराष्ट्रांत आहेत त्यांच्याशीं मराठी लेखकांचा विशेष परिचय नसल्या-

कारणानें त्यांच्या व्यवहारांतले हजारों वाक्प्रचार आम्ही गमावून बसलों आहों. कोळी, माळी, साळी, लोहार, सुतार, चांभार, पाथरवट, सोनार, भंडारी, गाबित अशा भिन्न व्यवसायांच्या लोकांच्या तोंडचे शब्द आम्हांला ठाऊकच नसतात आणि असले तरी ते वापरणें आम्ही कमीपणाचे समजतों. त्यामुळें ते हळू हळू लिखित भाषेंतून नष्टच होत आहेत. एकदां माझ्या बोलण्यांत मी "रापण" असा शब्द वापरला, तर कोणाला अर्थबोधच होईना. रापण म्हणजे खूप मोठें जाळें हा अर्थच कोणाला ठाऊक नव्हता. मग अर्थबोध कोठून होणार ? अशानें भाषा भरघोस बनण्याच्या ऐवजीं रोडकी बनत जाते.

तुला वाटेल कीं मी हस्तलिखित मासिकांच्या विरुद्ध आहे म्हणून. तसें मात्र मुळींच नाहीं. कारण हस्तलिखित मासिकें म्हणजे आपल्या छोट्याशा अंगणांत किंवा सज्ज्यांत चार कुंड्या, डबे ठेवून त्यांत मुलांनीं फुलवलेली बाग असें मी समजतों. त्यांत सदाफुली, शेवंतीचीं चार दोनच रोपटीं असतील. पण त्यासाठी मुलांनीं केवढी मेहनत घेतलेली असते ? किती प्रेमानें त्यांची जोपासना केलेली असते ? म्हणून त्या चार रोपट्यांचें मोलहि मला फार मोठें वाटतें. वेल जसा काठीच्या आधारानें मांडवावर चढतो, त्याप्रमाणें हस्तलिखित मासिकांच्या आधारानें मुलांतील चित्रकला, लेखनकला वाढीस लागत असते. त्यांचा आत्मविश्वास वाढतो. तुला लिहिलें याचा उद्देश एवढाच कीं तुम्ही मुलगे मुली जें कांहीं अल्पस्वल्प कराल तें नीट करा, चौकसबुद्धि वापरून करा आणि त्यांत निराळेपणा आणण्याचा यत्न ठेवा.

तुझा
**नाना**

मुंबई, ७ मार्च १९५१

  

## ५ : श्रमश्राद्ध

**प्रिय शुभा,**

कोल्हापूरहून काल सकाळीं तुमचा निरोप घेऊन निघालों तो तडक मूरलाच आलों. मध्यंतरीं जेवणाच्या निमित्तानें राजापुरास जो कांहीं थोडाफार वेळ मोडला असेल तो असेल. मूरला आमच्या गाड्या ठेचाळत हेंदकळत पोंचल्या, तो मध्यरात्र उलटून गेली होती. ढगाआडून पाझरलेल्या चंद्रम्याच्या प्रकाशानें काळोख उजळून भुरा झालेला होता आणि अणस्कुऱ्याच्या घाटापासून काजिडर्याच्या घाटापर्यंत पसरलेले डोंगर नि सडे, टेकड्या नि टेंबें वाकळी पांघरून शांत झोपीं गेल्यासारखीं दिसत होतीं. मधूनच एखाद्या ऐनाच्या उंच गेलेल्या झाडांत शेंकडो काजवे चमकत अथवा एखादें वाघुळ किंवा घुबड त्या भुऱ्या अंधाराच्या दर्यांतून आपलीं पंखांचीं वल्हीं मारीत सपकत निघून जात असे. आम्ही विचारांत पडलों कीं या काळ्या जंगलांत सेवादलाचें शिबिर सांपडावें तरी कसें ? गाडीवानांना रस्ता ठाऊक नव्हता आणि आम्ही तर पाहुणेच ! मग चंद्रा किर्लोस्कर आणि भाई शेटये विजेऱ्या घेऊन अंदाजानें शोध घेण्यासाठीं निघाले. पांच मिनिटें गेलीं तरी कसलीच हालचाल

दिसेना कीं इशारा मिळेना. वाटलें कीं या अंधारांत कोठें गडप झालीं कीं काय दोघें ! नाहीं पण तेवढ्यांत साद आली. विजेऱ्यांचे झोत काळोख विंधीत आले आणि एक भली मोठी चक्कर घेऊन आमच्या गाडया शिबिरांत येऊन दाखल झाल्या.

आम्ही उठलों तो चांगलें फटफटलें होतें. आतां पूर्वेला थेट सह्याद्रीच्या धारेपर्यंतचा प्रदेश, मूरपासून तेथपर्यंत चढत गेलेल्या डोंगरांच्या ओळी, पाचलवरून मूरकडे येणारा रस्ता, सगळें कांहीं साफ दिसूं लागलें होतें. रात्रीं जें गूढ होतें तें उघडें झालें होतें आणि जें भयाण व उग्र भासलें होतें, तें सौम्य व गरीब दिसूं लागलें होतें मी तोंड धुवून येतों तो शिबिराच्या अंगणांतला झेंडा ध्वजस्तंभावर फडफडूं लागला होता आणि सेवापथकाचे स्त्रीपुरुष सैनिक कुदळी, फावडीं व घमेलीं घेऊन गाणीं म्हणत कामावर निघाले होते.

मूर गांवाच्या बाहेर राईमध्यें शंकराचें देऊळ एका टेंबावर बांधलेलें आहे. त्याच्या पायथ्यापाशींच ओढ्याचा आसरा पाहून सेवापथकाची छावणी उभारण्यांत आलेली आहे. इंग्रजी L अक्षराच्या आकाराची ही छावणी म्हणजे कोंकणांत गुरांसाठीं उन्हाळीं कावण बांधतात त्या पद्धतीनें बांधलेली आहे. मेढीं उभारून त्यावर आडवे बांबू बांधले, त्यांच्यावर झाडांचे हिरवेगार टहाळ पसरले आणि सभोंवार टहाळांचाच कूड केला कीं झाली छावणी तयार ! येथें एका बाजूला पुरुष सैनिक राहतात; मध्यें कचेरी व पाहुण्यांच्या खोल्या आहेत आणि दुसऱ्या कडेला स्त्री सैनिकांचें दालन आहे. थोडया अंतरावर दुसरें एक कावण आहे ते सैंपाकघर. तेथें पाचलच्या माईंचें राज्य आहे. पथकांतील साऱ्या मुलांच्या व मुलींच्या त्या आई आहेत. त्यांना

विश्रांति माहीत नाही. त्यांना विश्रांतीची जरूरी भासत नाही. सगळयांची सकाळची न्याहारी, दुवक्ताचें जेवण आणि चहा एवढें तर त्या उरकतातच पण त्यांतच आजूबाजूच्या पंचक्रोशींतील गांवांतून कोणी बाळंतीण अडली तर तिची सोडवणूक करून परत शिबिरांतल्या कामावर त्या हजर होतात! माईंची जीभ तिखट आहे, हात कामसू आहेत, बुद्धि कर्तव्यपरायण आहे, आणि मन विशाल आहे. शुभा, अशीं माणसें पाहिलीं कीं मला एखादवेळ वाटतें कीं आम्ही करतों ती धावपळ व्यर्थ आहे. आमचें काम म्हणजे वाऱ्याच्या वारेमाप भणभणीसारखें. पण हीं माईंच्या सारखीं माणसें म्हणजे,

> फेडित जनांचें पापताप । पोखित[1] तीरींचे पादप
> समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥

मूर हें गांव चोहींकडून लहानमोठ्या डोंगरांनीं घेरलेलें आहे. डोंगरांच्या द्रोणांत ठेवल्यासारखें दिसतें तें. मूर हें गांवाचें नांव मुऱ्हें या शब्दावरून पडलें असावें. मुऱ्हें म्हणजे डोंगरकपारीची वस्ती. मूर आणि त्याच्या आसपासच्या आठदहा गांवांना जवळचें शहर म्हणजे राजापूर. घाटावरचीं मलकापुरासारखीं गांवें जवळच आहेत. पण तेथें पोंचावयाचें म्हणजे अणस्कुऱ्याच्या घाटासारखे उभेसूळ घाट चढावे लागतात. ते घाट फोडून सोपे करावयाचे म्हणजे फार खर्चाचें व बिकट काम असल्यामुळें या तळवटांतल्या गांवांना राजापुराशींच हमेशा व्यवहार करावा लागतो. कौला-चिऱ्या[2] सारख्या अवजड वस्तूपासून हळद, मीठ, मिरचीसारख्या हरगरजेच्या वाणजिन्नसापर्यंत सगळया मालाची वाहतूक पाचलवरून येणाऱ्या रस्त्यानें करावी

---

१ पोखित = पोशित. २ चिरा = तासलेला दगड.

लागते. पण राजापूर ते पाचल रस्ता तर असा आहे कीं प्रवाशाचीं निम्मीं हाडें एका फेरींत मोकळीं व्हावींत. पुढचा पाचलपासून मूरपर्यंतचा रस्ता तर विचारूंच नको. मूर गांवाच्या वर सुमारें एका मैलावर जी खिंड आहे तिच्यांतून बैलगाड्या सुखरूप आणणाऱ्या गाडीवानांची तारीफ करावी कीं बैलांची तें समजत नाहीं. खिंडीपर्यंत गाडी ओढतांना बैल उरीं फुटतात नाहीं तर पायांत मोडतात. अशा या रस्त्याचा ढाळ जरा हलका करणें, डोंगर तोडून रस्ता जरा रुंद करून घेणें आणि रस्त्यांत आलेल्या धोंडी, झाडांचे ठोंब खणून काढून तो साफ करणें अत्यंत जरूर होतें. पण हें काम करणार कोण ? जिल्हा लोकलबोर्ड करीना आणि गांवकरीहि करीनात. रस्ता मात्र दरवर्षीं पावसानें धुपून जाऊन आणि वाहतुकीमुळें झिजून अधिकाधिक धोक्याचा बनूं लागलेला होता.

म्हणून रत्नागिरीच्या सेवापथकानें ठरवलें कीं त्या रस्त्याची दुरुस्ती आपण हातीं घ्यावयाची. हिंदुस्थानासारख्या सात लाख खेड्यांच्या आपल्या या देशांत रस्ते म्हणजे रक्तवाहिन्या होत. मनुष्याच्या रक्तवाहिन्या वाहत्या राहिल्या तरच रक्ताचें अभिसरण होणार; ताज्या रक्ताचा पुरवठा नि शिळ्या रक्ताचें शुद्धीकरण होऊन देहांतील पेशीन् पेशी कार्यक्षम राहणार. त्याचप्रमाणें देशांतले लहानमोठे रस्ते व्यवस्थित वाहाते राहिले तरच दळणवळण व व्यापार उदीम चालणार; नवें ज्ञान व नवीं साधनें फैलावणार. पण रस्ते बांधणें फार खर्चाचें काम असतें. मैलभर रस्ता करावयाचा तर हजारो रुपये खर्च येतो आणि आपला देश तर पडला गरीब. कोठून आणावयाचे हजारो लाखो रुपये ? पण आपल्यापाशीं द्रव्यबळ नसलें तरी दुसरें एक बळ आपल्यापाशीं आहे ना ? तें म्हणजे मनुष्यबळ. हिंदुस्थानांतील पस्तीस कोटी लोकसंख्येपैकीं दहा

कोटी माणसें सोळा ते पन्नास वर्षांपर्यंतच्या वयाचीं आहेत असें मानूं. शुभा, दहा कोटी माणसांनीं देशासाठीं, समाजासाठीं रोज फक्त तास अर्धा तास जरी काम केलें तरी केवढीं कामें पार पडतील याची कल्पना कर. पैसा तरी माणसें कष्ट करतात तेव्हांच नजरेस पडतो ना ? मग कष्ट करण्याची शक्ति आपल्यापाशीं जोवर आहे तोवर पैसा नाहीं म्हणून रडत बसणें म्हणजे रामदासांनीं म्हटल्याप्रमाणें " घरीं कामधेनु पुढे ताक मागे ! " असा वेडेपणाचा प्रकार नाहीं का होणार ?

पण आपल्या देशांतील हें मनुष्यबळ आज अंधळें होऊन बसलें आहे. रुसून बसलें आहे. कडेला पडून गंजून जात आहे. आपल्या हिंदळ्यास काळभैरवाच्या देवळापर्यंत जी चिरेबंदी वाट बांधलेली आहे ती तूं पाहिलीस ना ? ती गांवकऱ्यांनींच बांधलेली. पण हिंदळ्याचेंच कशाला ? जवळ जवळ प्रत्येक गांवांत तुला पूर्वीं बांधलेलीं देवळें, तळीं, रस्ते, घाट दिसून येतील. हीं सगळीं कामें गांवकऱ्यांनीं आपल्या सामुदायिक श्रमांनीं पार पाडलेलीं आहेत. पण गेल्या दीडशें वर्षांच्या पारतंत्र्याच्या काळांत सामुदायिक श्रमाचा हा कल्पवृक्ष वठून, झडून गेला आहे. तो पुन्हा फुलवला पाहिजे. पण अगोदर त्याचीं मुळें कोणीतरी जरा चाळवलीं पाहिजेत, त्याच्यावर नवीन विचाराचें संजीवन कोणीतरी शिंपलें पाहिजे. हें काम महाराष्ट्रांत साने गुरुजी सेवापथकाच्या युवक–युवती करीत आहेत. पंजाब, उत्तर प्रदेश, बिहार, ओरिसा इत्यादि प्रांतांत समाजवादी व इतर पक्षांचे लोक करीत आहेत. "देश के लिये एक घंटा !" ( देशासाठीं एक तास ) असा जयघोष करीत ते कालवे खणीत आहेत, तळीं उपशीत आहेत. ताली बांधीत आहेत, रस्ते काढीत आहेत. देशाच्या मनुष्य–बळावर चढलेला गंज खरवडून घासून काढण्यासाठीं ही सारी धडपड चालू आहे.

सात साडेसातच्या सुमाराला मी मूरच्या खिंडींत गेलों. खिंडीशीं पोंचेपर्यंतच्या पाउण मैलाच्या घाटीवर गेल्या पंधरा दिवसांत सेवापथकाच्या सैनिकांनीं आणि पंचक्रोशींतील गांवकऱ्यांनीं जें काम केलें होतें त्याची साक्ष जागोजाग आढळत होतीच. डोंगराकडची बाजू दोन तीन हात खापून काढून सर्व रस्ता रुंद केला होता. डोंगराच्या उतरणीवर गटारें काढून पावसाचें पाणी परभारें वरच्यावर काढून लावण्याची व्यवस्था केली होती. जेथें वळण फार मुरडीचें होतें तेथें तर रस्ता इतका ऐसपैस केलेला होता कीं दोन बैलगाड्या सुखानें जांव्यात. कवेंत न मावतील असे धोंडे निखळून काढून खालच्या दरडींत कोसळून घातले होते. काम जवळ जवळ संपत आलें होतें. माथ्यावर ऐन खिंडींत पडलेल्या चाकोऱ्या नि खड्डे भरून काढून दोन्ही बाजूनें गटारें तयार करण्याचें काम तेवढें उरलें होतें. आज शेवटचा दिवस. आज संध्याकाळपर्यंत एवढें काम पुरें करावयाचेंच असा सैनिकांनीं निश्चय केलेला होता.

मुलगे, मुली, शेतकरी, बाप्ये आणि बाया झाडून सारीं कामाला लागलीं होतीं. मुलें मुरूम खणीत होतीं आणि मुली घमेली भरभरून तो मुरूम धोंडे पसरून तयार केलेल्या माचावर पसरीत होत्या. कांहीं जण कुदळी घेऊन दोन्ही कडांचीं गटारें बनवीत होते. ह्या वाव वाव लांबीच्या पहारी पाहिल्यास, ह्या फार जड आहेत. पण कांहीं ठिकाणचा फत्तर असा चिवट आहे कीं ह्या अवजड पहारींचीं टोंकेंहि तो वळवून टाकतो आहे. पण दगड एकदम घाव घेत नसला म्हणून काय झालें ? खण् खण् खण् खण् असे घाव चालूच आहेत.दगड दाद देत नाहीं. एखादा कळपा कपची उडाली तर उडते आहे. पण घावांना खंड नाहीं. हाताला घट्टे पडत आहेत आणि दगडावर घाम ठिबकतो

आहे ! पाहूं या माणूस हरतो कीं दगड हरतो तें. शेवटीं एका घावाला पहारीखालीं खणखणणारा फत्तर बद्द वाजला आणि दुसऱ्या घावाला त्याचीं छकलें पडलीं ! रस्त्यांतलें एक टेंगुळ साफ झालें. आतां दुसरें, मग तिसरें, चौथें, पांचवें. हीं टेंगळें साफ झालीं कीं बैलांचीं गेचकें गाडी ओढतांना फाटणार नाहींत, त्यांचे खूर मोडणार नाहींत आणि गाडीचीं चाकें निसटून गाडीचा साटा ढिला होणार नाहीं.

असें हें काम चाललें आहे. अंगुळ अंगुळ कामाचें हातभर काम होतें आहे आणि हात हात काम करतां करतां एक गांव दुसऱ्या गांवाशीं जोडला जातो आहे. तिकडे खानदेशांतल्या कोचूरपासून बेळगांवच्या काकतीपर्यंत आणि रत्नागिरीच्या मूरपर्यंत दाही जिल्ह्यांत विद्यार्थि-विद्यार्थिनी, शेतकरी आणि कामगार मिळून दोन तीन हजार माणसें सामुदायिक श्रमाचे पाठ गिरवीत आहेत, आणि त्यांच्या श्रमामुळें केवळ नवे रस्ते, नवीं तळींच तयार होत नाहींत तर नवीं मनें तयार होत आहेत ! कारण संध्याकाळीं काम संपलें कीं आजूबाजूच्या खेड्यांत सेवापथकाचीं मंडळीं जातात. गांवकऱ्यांना जमवतात. त्यांना गाणीं म्हणून दाखवतात, जगांतील घडामोडी त्यांना समजावून सांगतात. मुली गांवकरी बायकांना भेटतात. त्यांच्याशीं बोलतात, त्यांना कामाला घेऊन येतात. खेड्यांतलें जिणें किती कष्टाचें आहे, रूढींनी किती ग्रासलेलें आहे, त्याचें पथकांतील सैनिकांना प्रत्यक्ष ज्ञान होतें. सुशिक्षित जीवनाचा धागा श्रमिक जीवनाशीं जोडून घेण्याचा हा प्रयत्न आहे.

संध्याकाळीं शिबिरामध्यें समारोपाचा समारंभ झाला. त्यासाठीं रत्नागिरीचे कलेक्टर आले होते. शिबिराचे प्रमुख श्री. सावंत यांनीं अहवाल

वाचून किती काम झालें त्याची माहिती दिली तेव्हां समारंभासाठीं आलेल्या गांवकऱ्यांना आश्चर्य वाटलें. आपण पंधरा दिवसांत एवढें काम केलें याची त्यांना कल्पना नव्हती. ती हकीकत ऐकून त्यांच्यांत असा उत्साह संचरला कीं त्यांनीं समारंभ संपल्यावर कलेक्टरकडे एक अर्ज सादर करून अशी मागणी केली कीं पावसाळा उलटल्यावर आम्हां गांवकऱ्यांचा मनसुबा काजिडर्याचा घाट फोडण्याचा आहे तरी त्यासाठीं सरकारकडून परवानगी मिळावी ! गांवकरी म्हणाले कीं त्या कामासाठीं पांचशें पासून हजारपर्यंत गडी—माणूस लागलें तरी तें आम्ही उभे करूं !

समारंभ आटोपल्यावर आम्ही जरा इकडे तिकडे करीत होतों तो घाटीकडून जयघोष ऐकूं आला. माधव चव्हाण आपले कांहीं सहकारी घेऊन खिंडींतच काम करीत राहिला होता. ते समारंभाला हजर राहिले नाहींत. खिंडींतलें काम दुपारीं बारा वाजेपर्यंत पुरें झालेलें नव्हतें. त्यामुळें त्यांना चैन पडेना. जेवण आटोपून ते परत गेले. दुशीकडच्या गटारांचें काम त्यांनीं हातावेगळें केलें, रस्त्यावरचा मुरूम नीट पसरला, गटारांच्या कडेच्या धोंडी सारख्या बसविल्या आणि मगच ते परतले. तोंपर्यंत समारंभ संपून गेला होता. शिबिराच्या अंगणांतला झेंडा उतरवून घेण्यांत आला होता आणि सैनिक शिबि-राची आवराआवर करूं लागले होते.

आमची राजापुरास परतण्याची वेळ झाली. गाडया जुंपून तयार होत्या पण मी पायींपायींच घाटी चढून गेलों. खिंडीशीं पोंचल्यावर मी क्षणभर मागे वळून पाहिलें. उजव्या बाजूला अर्ध्या मैलावर शिबिराच्या अंगणांतला पेट्रोमॅक्स झगझगत होता आणि सेवापथकांतील सैनिकांचा

किलबिलाट कानावर येत होता. चंद्रबिंब धारमाथा सोडून हातभर वर सरकलें होतें आणि डोंगरांच्या द्रोणांतलें तें मूर गांव पुन्हा त्या भुऱ्या काळोखांत पेंगूं लागलें होतें. माझीं पावलें चढणीवर पडत असतां पायाखालीं नव्यानें पसरलेला मुरूम मऊ लागत होता आणि पाचलकडून येणाऱ्या गाडयांचीं चाकें वरगंळीस लागल्यावर आतां न ठेचाळतां न आपटतां त्या मुरमांतून घुरू घुरू करीत मूरची घाटी उतरत होतीं. तो आरामशीर आवाज ऐकल्यावर मीं मनांत म्हटलें, ‘ गुरुजी, सारा जन्म या देशासाठीं तुम्ही चंदनासारखें झिजलांत, तुमचीं श्राद्धें व स्मारकें इतर कोणी जीं कांहीं करावयाचीं तीं करोत, पण आज तुमच्या नांवानें महाराष्ट्रांत जें कार्य खेडोपाडीं चालू आहे, त्या श्रमश्राद्धाला तोड नाहीं ! ’

शुभा, मी पाचलच्या वाटेला लागलों तेव्हां सगळीकडे पसरलेल्या मंद चांदण्यासारखाच आनंद माझ्याहि मनांत भरून राहिला होता

तुझा

**नाना.**

मूर ( पाचलमार्गें ) ता. १५।५।५१

## ६ : पाऊस आला !

**प्रिय शुभा,**

रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिण भागांतल्या दौऱ्याला जेव्हां मी प्रारंभ केला तेव्हां मला हिंदळ्यास जायला मिळेल असें स्वप्नांतसुद्धां वाटलें नव्हतें. कारण दौऱ्याचा जो मार्ग माझ्या हातीं श्री. दादा शिखऱ्यांनीं दिला त्यांतून सबंध देवगड तालुकाच बाद केलेला होता. मग हिंदळें येणार कोठून ? पण कणकवलीस देवगडच्या राम खडपकरांचें रागावून लिहिलेलें पत्र मिळालें आणि पत्राच्या मागोमाग रामचे स्नेही श्री. मुंज स्वतःच आपला राग " सुनवण्यासाठीं " येऊन दाखल झाले. ते म्हणाले, " देवगड अजिबात वर्ज्य केलं याचा अर्थ काय ? " त्यांची सुनावणी एवढी जबरदस्त होती कीं ती ऐकल्यावर आमच्या दौऱ्याचें सुकाणूं देवगडकडे फिरलें ! आणि सर्वानुमतें ठरलें कीं दोन दिवस देवगड तालुक्यांत हिंडावयाचें. मिठबावला सभा योजलीच होती. मग पलीकडेच हिंदळ्यास सभा ठेवून मला खूष करण्याची संधि व्यवहारचतुर श्री. मुंज कशी गमावतील ? अशा प्रकारें मी अचानक हिंदळ्याकडे वळलों.

मिठबावची सभा आटोपून आम्ही रामेश्वराच्या देवळांतून बाहेर पडतों तो उन्हें झावळांवर[1] गेलीं होतीं. भरतीमुळें नदींत तुडुंब पाणी भरलें होतें आणि झुळुझुळु वाहणाऱ्या वाऱ्याचा स्पर्श होऊन नदीच्या विस्तीर्ण झालेल्या पात्रावर लहान लहान लाटांचे खवले पडले होते. मी तरीवर होडीसाठीं जरा वेळ उभा होतों तेवढ्यांत पलीकडे गाबित-वाड्यापासून गिरावळीच्या घाटीपर्यंत पसरलेला हिंदळ्याचा किनारा मीं पाहून घेतला. सारें कांहीं लहानपणापासून मी पाहात आलों आहे तसेंच होतें. पण नाहीं. गिरावळीच्या डोंगरावर आडव्यामध्यें नस्ताच्या[2] दिशेला तोंड करून एक बंगली उठवलेली मला दिसली. ताशीव जांब्या दगडांची ती चिरेबंदी इमारत काजीच्या पानांमधून चमकणाऱ्या रात्या[3] बोंडूसारखी सुंदर दिसत होती. होडीवर तार्या नव्हताच. अभ्यंकरांचा मुलगा होडी चालवीत होता. हिंदळ्याच्या माणसांना बाजार म्हटला कीं मिठबावीस जावें लागतें. मुलांना इंग्रजी शिकायचें तरी मिठबावीस जावें लागतें. उठल्यासुटल्या तार्या आणायचा कोठून ? तेव्हां बहुतेक पुरुषमाणसें होडी चालवावयास शिकतात. कांहीं बायकाहि होडी चालवतात. आमच्या या नदीचा तळ साफ आहे, आणि होडीला उलांडें असतें त्यामुळें भीति कमी. होडींत बसल्यावर अभ्यंकराला विचारलें कीं ही बंगली रे कोणाची ? तर तो म्हणाला मसुरेकरांची. मसुरेकरांनीं मोठी मोक्याची जागा शोधून तेथें इमारत उठविल्यामुळें हिंदळ्यांचें सौंदर्य वाढलें आहे यांत शंका नाहीं.

गिरावळीच्या डोंगराच्या मागें पिंजलेल्या कापसाच्या ढिगासारखे मऊ दुलदुलीत अंगाचे ढग एकावर एक रचलेले होते. पण त्यांचा

---

१ झावळांवर = नारळीच्या पानांवर. २ नस्त = जेथें खाडी समुद्राला मिळते ती जागा. ३ राता = तांबडा.

रंग कोणता म्हणून सांगूं ? कथलाच्या मळकट रंगापासून तों भट्टींत घातलेल्या सोन्याच्या रंगापर्यंत सर्व रंग तेथें हजर होते. मीं म्हटलें हे पावसाचे ढग नव्हेत खास. अजून मृग निघायला पंधरा दिवस आहेत. शिवाय पावसाचे ढग येतात तेव्हां ते सैन्यासारखे एका पलटणीमागोमाग दुसरी पलटण यावी तसे येतात. त्यांचा पोषाखहि या ढगांच्या वस्त्राभरणाप्रमाणें बहुरंगी नि बहुढंगी नसतो. गडद राखी रंगाचा गणवेश पेहरून पावसाळी ढगांचीं पलटणें समुद्राकडून चालून येतात. खरे पावसाळी ढग पाहिले कीं मला नेहमीं माजलेल्या रेड्यांची आठवण होते. त्यांच्यासारखेच ते दिसतात. धुंद, तुंद, रगेल नि कशाला तरी टक्कर देण्यासाठीं आतुर झालेले. हे ढग तसे नव्हते. ते दोंद सुटलेले, नटवे, रंगेल नि ऐषआरामी दिसत होते. पण माझा हा अंदाज रात्रीं साफ खोटा ठरला ! सूर्यास्त झाल्याबरोबर त्यांनीं आपले हे विलासी पोशाख फेकून दिले आणि आपल्या खऱ्या स्वरूपांत ते प्रकट झाले !

होडींतून उतरल्यानंतर आपल्या घरापर्यंतचा मार्ग म्हणजे जणूं माझ्या पायाखालचा ! हें आलें वळंजूचें दुकान, पुढें हें मुसलमानाचें घर, नंतर हा सतीचा पार, नंतर म्हारांची राई. तेथून थोड्या अंतरावर स्वामीचें (कार्तिकस्वामीचें) देऊळ आणि जरा शेत तुडवलें कीं आलें आपलें घर. यंदा विष्णूनें व भिवानें ल्व्ही केली आहे. मी गेलों तेव्हां ल्व्हीचें शिंपणें चालू होतें. ल्व्ही हें नाचण्यासारखें उन्हाळी पिकणारें धान्य आहे. मोजून साठ दिवसांत तें तयार होतें. कोंकणच्या शेतकऱ्यापाशीं पावसाळी धान्य उरत नाहीं म्हणून गिमांत ल्व्ही करावी, जें काय मण अर्धा मण धान्य पदरांत पडेल त्याचा पावसाळी भाकरतुकडा करून खावा, या हिशोबानें रात्रंदिवस खपून तो हें दरिद्री पीक

काढीत असतो. लव्हीला मेहनत फार करावी लागते. रोज दुवक्तां शिंपावें लागतें. पाण्याच्या बरोबरीनें घाम गाळावा लागतो. तेव्हां कोठें पसापायली दाणे पदरांत पडतात. कोंकणांतल्या शेतकऱ्याचें जीवन असें अति कष्टाचें असतें.

रात्रीं बहिरीच्या देवळांत सभा ठेवली होती. सभा आटोपेपर्यंत ११-११॥ वाजले. आतां आभाळांत ढगांची जमवाजमव बरीच झाली होती. चंद्र उगीच अधूनमधून डोकावून जात होता. लव्हीमध्यें पाण्याच्या आसऱ्यानें बसलेले बेडूक रोरावत होते. ते वर्षासूक्तें म्हणून पावसाला आमंत्रण देत होते कीं काय कोण जाणे? वारा साफ नाहीं तरी जवळ जवळ पडलाच होता. नुसते शिजत होतें. घरीं आल्यावर आम्हीं ठरवलें कीं खळ्यांत[1] डाळ्या[2] पसरून तेथेंच ताणून द्यावयाची. लांबून दबलेल्या आवाजांत मेघगर्जना ऐकूं येत होती. मधूनच वीज लवत होती. आणि खळ्याच्या पेळेवरच्या[3] अनंताचीं तळहाताएवढीं पांढरधुप्प फुलें त्या अंधारांतहि उठून दिसत होतीं.

असा दोन तीनचा सुमार असेल. एकाएकी वारें उठलें. टोपलीचें झांकण उघडतांच फडा काढून नाग बाहेर यावा तसा वारा फुत्कारत बाहेर पडला आणि बेगुमान वाहूं लागला. माडा–पोफळींना कळेना कीं आपलें माथें कोणत्या दिशेला झुकवावें. आंब्यांच्या फांद्या करकरूं लागल्या आणि अजूनहि कोठें कोठें चिटकून राहिलेलीं गेल्या हंगामांतलीं वठलेलीं पानें आंब्याफणसावरून खळाखळ गळूं लागलीं. वर मेघांची प्रचंड दंगल सुरू झाली आणि अंमळशानें ताशाच्या चामड्यावर काठी तडतडावी तसे पावसाचे टपोरे थेंब पानांवर, कौलांवर व जमिनीवर तडतडूं लागले. धरित्रीच्या पोटांत जणू या क्षणाचीच वाट

१ खळें = अंगण. २ डाळी = बांबूची चटई. ३ पेळ = बांध.

पाहात जे जे सुगंध दडले होते ते उचंबळून वर आले आणि त्या सुगंधांनीं नाकपुड्या भरून जातांच गोठ्यांतील गुरें आनंदून जाऊन " हम्बे " करून ओरडूं लागलीं, दाव्याला ओढ घेऊं लागलीं, हुंकारूं लागलीं. जणूं तीं म्हणत होती " आला ! पाऊस आला ! " काकू उठली आणि खळ्यामध्यें आधींच तयार करून ठेवलेल्या आळ्यांतल्या राबाला तिनें आग घातली. वारा सोसावत होता, वरून पाऊस कोसळत होता आणि खालीं राबाच्या पुरुष पुरुष उंचीच्या ज्वाळा लवथवत होत्या. त्यांतून उडणारीं किटाळें वाऱ्याच्या झोताबरोबर लांबवर वेडीं-वाकडीं जाऊन विझत होतीं. ज्वाळांच्या उजेडानें अंगणाभोंवतालीं काळोखांत उभ्या असलेल्या झाडापेडांचीं पानें क्षण दोन क्षण उजळून निघत होतीं आणि राबांतलें गवत तडतडत होतें. पुढें याच पाण्यांतून, याच धर्गीतून आणि याच मातींतून काकीच्या काकडीचा नाहींतर पडवळाचा वेल मांडवावर चढेल आणि त्यावर अमृतासारखीं गोड फळें बाजतील !

तांबडें फुटेपर्यंत पावसाच्या सरी येतच राहिल्या. पण शहाणा पाहुणा एका रात्रीहून जसा अधिक मुक्काम करीत नाहीं त्याप्रमाणें सकाळीं आम्ही उठून पाहतों तों आकाशांतले सारे पाहुणे निघून गेलेले. मी मागील दाराच्या पायरीच्या कलमाखालून विहिरीवर गेलों आणि न्हाऊन स्वच्छ झालेल्या सभोंवारच्या सृष्टीकडे पोट भरेतोंवर पाहिलें. किती प्रसन्न दिसत होती ती ! सौम्य, सस्मित आणि शीतळ असें तिचें तें रूप पाहून, शुभा, माझें मन कसें बहरून आलें ! एका रात्रींत केवढा पालट घडून आला होता ?

रातांब्रीच्या झाडाच्या खोडावरून डुमल्यांची[1] रांग झपाट्यानें हालचाली करीत होती. विहिरीच्या चिऱ्यांच्या फटींतून धावऱ्या मुंग्या वऱ्यांच्या दाण्यांसारखीं अंडीं तोंडांत धरून पलीकडच्या पातेरींत कोठें अदृश्य होत होत्या कोण जाणे? शेजारच्या काजूच्या झाडावर डोक्यावर शेंदुर थापून आणि तोंडांत रक्ताची गुळणी धरून एक सरडा कोणत्या तरी उग्र देवतेचें ध्यान करीत बसला होता! काल संध्याकाळपर्यंत निबर, मळकट आणि चरबट दिसणारीं नाना प्रकारच्या वृक्षांचीं पानें आज एकाएकीं स्वच्छ आणि हिरवींचार दिसूं लागलीं होतीं.

आणि आपला पाण्याचा पाट? काल हिराच्या काडीसारखी निर्जीव झालेली त्याची धार आज हत्तीच्या सोंडेसारखी होऊन तळीमध्यें कोसळत होती. सकाळीं पाण्यासाठीं आलेल्यां भिवाच्या बायकोला काकू म्हणाली, "आमची गंगा इली, आतां आमकाँ भय नाय! (आमची गंगा आली, आतां आम्हांला काळजी नाहीं!) खरोखरच गंगेच्या पाण्यासारखी ती पांढरी शुभ्र धार पाटांतून खळाळत वाहात होती आणि तहानलेल्या माडांचीं, पोफळींचीं, केळींचीं मुळें त्या पाण्याचें आकंठ पान करून घेत होतीं. वर पानांच्या टोंकापर्यंत तो जीवनरस झपाझप खेंचला जात होता आणि पानांच्या पेशीपेशीमध्यें तो रिचवला गेल्यामुळें तीं पानें गहिरीं दिसूं लागलीं होतीं. भिवाचीं आणि लखूचीं सगळीं मुलें आंब्याच्या रसानें आणि घामानें करवडलेलीं आपलीं अंगें त्या खळाळत्या पाण्यांत स्वच्छ करीत होतीं. आतां दोनचार घटका तरी तीं पाण्यापासून दूर होणार नाहींत. त्यांची दिवाळी आजच आहे!

---

१ डुमले = अतिशय चावऱ्या मुंग्या.

मी खालीं भिवाच्या लव्हीकडे गेलों. आज शिंपणें बंद होतें. पावसांत भिजलेलीं लव्हीचीं कणसें ठोसर दिसत होतीं. वाऱ्याच्या सपकाऱ्यानें कांहीं ठिकाणची लव्ही आडवी झाली होती. दोन कुणगे सोडून पलीकडच्या कुणग्यांत उभा असलेला लखूचा पाडा नाक फेंदारून हवेंतला सुगंध शोषून घेत होता, खुरांनीं जमीन उकरीत होता, आणि आपल्या टीचभर लांबीच्या अणकुचीदार शिंगांनीं कुणग्याची मेर ढांसळून पाडीत होता. वासरूं गाईला लुचतांना तिच्या कासेला जशा ढोसण्या देतें, त्याप्रमाणें तो जणूं कांहीं धरित्रीला ढोशीत होता आणि म्हणत होता, " तुझ्या वासाच्या एवढ्याशा घोटानें माझी तृप्ति होणार नाहीं. मला आणखी दे, आणखी दे ! " त्याचा हा अवखळपणा पाहून शेजारच्या कुणग्यांत जोत धरलेला भिवा लटक्या रागानें त्याच्यावर डाफरत होता. " फटकी इली त्येच्यार ! माजलो कित्याक तो, ऊं ! " (पटकी झाली त्याला, माजला कशानं तो, अँ ! )

भिवा जोत हाकीत होता. पावसानें नरम झालेल्या जमिनींत नांगराचा फाळ सहज घुसत होता आणि मऊ काळसर माती वर येत होती. सकाळच्या थंड वेळीं बैल हुरूपानें चालत होते. अर्ध्या तासांत कुणगा नांगरून झाला. मग सुपांतलें भात मुठींत घेऊन भिवानें पेरणी केली. तरव्याची पेरणी दाट करावी लागते. पेरणी झाल्यावर भिवानें पुन्हा नांगर फिरविला. बी मातींत नीट मिसळल्याची खात्री झाल्यावर पुढच्या कुणग्यांत नांगरणी सुरू झाली. भिवानें वाफसा साधला आहे. वाफसा साधून पेरणी केली कीं रोप जोमदार निपजतें. भाजून काढलेल्या जमिनींतून पहिल्या पावसाच्या सरीसरशीं ज्या वाफा बाहेर

पडूं लागतात त्यांच्या उबेनें आतां हे भातगोटे फुगतील, फुटतील आणि त्यांतून नव्या जीवनाचे लुसलुशीत पोपटी कोंभ जमिनीची कवंदी हळूच फोडून वर येतील. हीं नव्या वर्षाचीं नवीं बाळें.

घराकडे मी परत आलों आणि मागच्या दारच्या पावठणीवर[१] बसलों. काकू आळवाची देठी सोलीत होती. पडवीच्या कोपऱ्यांत कणगरांचा व करांद्यांचा[२] ढीग पडलेला होता. त्यांना हात हात लांबीचे अंकुर फुटले होते. मीं काकूला म्हटलें, "काकू, तें बघ काय?" काकूनें तिकडे बघितलें आणि ती कौतुकानें म्हणाली, "पाऊस आला ना, आतां त्यांना धीर निघायचा नाहीं!"

जेवल्याबरोबर आम्हांला पुढच्या मार्गाला लागावयाचें होतें. म्हणून मी तळीवर गेलों आणि पहिल्या पावसाच्या त्या धारेखाली मनसोक्त स्नान केलें. शुभा, स्नान करतांना दहादां माझ्या मनांत आलें कीं तूं या वेळीं येथें असतीस तर पहिल्या पावसाचें हें वैभव पाहून तूं नाचली असतीस. कारण पुण्यांतल्या घराच्या सज्जांत उभें राहून पाऊस पाहणें निराळें आणि उघड्या सृष्टींत वाऱ्याचा वारू करून मुऱ्ह्याखोऱ्यांतून झाडापेडावर टापा हाणीत दौडत जाणारा पाऊस पाहणें निराळें! माणसाला धुंद करून टाकणारें तें दृश्य असतें. गतवर्षी तूं कोंकणांत होतीस तेवढ्यांत पाऊस एकदांहि आला नाहीं. ठीक आहे. पुन्हा केव्हांतरी योग जमून येतो का पाहूं.

तुझा

**नाना**

कोल्हापूर, ता. २५–५–५१

---

१. पावठण = पायरी. २. कणगर–करांदे = एक प्रकारचे खाण्यास योग्य असे कंद. मृगनक्षत्राच्या सुमारास त्यांना आपोआप कोंभ फुटूं लागतात.

## ७ : धुमकुडिया

**प्रिय शुभा,**

जेव्हां जेव्हां प्रवासाच्या निमित्तानें देशांत निरनिराळ्या ठिकाणीं जाण्याचा मला योग येतो तेव्हां तेव्हां आपल्या या प्राचीन देशाचा विस्तार आणि त्यांत वस्ति करून राहिलेल्या नाना मनुष्यसमाजांचें दर्शन घडून माझें मन विस्मित होऊन जातें. किती प्रकारचे चेहरे, किती प्रकारचे पेहराव, किती प्रकारचे रीतिरिवाज ! वाटतें कीं हिन्दुस्थानाला रवीन्द्रनाथ टागोरांनीं ' मानवेर सागर ' म्हणजे ' मानवांचा सागर म्हटलें आहे तें किती यथार्थ आहे ! सागरामध्यें जसे नाना रंगांचे, नाना रुचींचे, नाना स्थळींचे जलप्रवाह एकवटतात, तसे आपल्या या भारतांत नाना मानवप्रवाह एकत्र आलेले आहेत. कोणी इजिप्तमधून समुद्र ओलांडून इकडे आले, तर कोणी आले कॉकेशसच्या व समरकंदच्या बाजूनें खैबर खिंडींतून. कोणी मानस सरोवरापलीकडच्या जगाच्या आढ्यावरून खालीं भारतांत उतरले, तर कोणी मणिपुरासभोंवतींचीं निबिड अरण्यें पार करून आले. कोठें शालि-

ग्रामासारख्या चकचकीत काळ्या कातडीचे मद्रासी, तर कोठें गुलाबाला लाजवील अशा तांबुस गौरवर्णाचे काश्मिरी. कोठें खैराच्या खोडासारखे आटीव पण ठेंगणे गुरखे, तर कोठें शालवृक्षासारखे उंच नि सरळ पंजाबी ! असा हा विविध-रमणीय आपला हिंदुस्थान देश आहे.

गेले पंधरा दिवस आम्ही रांचीस राहात आहों. या शहराच्या आसपासच्या प्रदेशांतले म्हणजे छोटया नागपुरांतले सडसडीत बांध्याचे, सांवळ्या रंगाचे, बसक्या नाकाचे, रुंद चेहऱ्याचे व काळ्याभोर डोळ्यांचे रहिवासी हा हिंदुस्थानांतील मानवी सागरामधला एक वेगळाच प्रवाह आहे. हे लक्षावधि रहिवासी स्वतःला आदिवासी म्हणजे हिंदुस्थानांतले आद्य किंवा मूळचे रहिवासी असें म्हणवून घेतात. आणि या प्रदेशाला झाडखंड या नांवानें संबोधितात. त्यांच्यामध्यें मुंडा, उराँव, संताळ, हो इत्यादि जमाती आहेत. या लोकांची भाषा, त्यांचीं देवदैवतें, त्यांचे सणवार, त्यांच्या चालीरीति, थोडक्यांत म्हणजे त्यांची संस्कृति हिंदुस्थानांतील इतर प्रांतांमधल्यापेक्षां खूपच निराळी आहे. मी ह्या लोकांसंबंधीं पुस्तकांतून थोडेंफार वाचलें होतें. पण त्यांचें जीवन प्रत्यक्ष पाहण्याचा योग पूर्वी कधीं आला नव्हता. ती संधि येथें समाजसेवा करणाऱ्या एका आदिवासी सज्जनाच्या कृपेनें मिळाली. त्या गृहस्थांचें नांव श्रीयुत थेब्ले उराँव.

श्रीयुत थेब्ले उराँव हे दाढीमिशा पिकूं लागलेले, मध्यम उंचीचे व किरकोळ शरीरयष्टीचे पुरुष आहेत. गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत छोटा नागपूरमधील जंगलांत वस्ति करून राहिलेल्या या जमातींना आधुनिक जगाची ओळख करून देण्याचें कार्य जर कोणी चालू ठेवलें असेल तर तें ख्रिस्ती धर्मप्रचारकांनीं. पण परधर्मी प्रचारकांनीं

वाढवलेला समाज दाईनें वाढवलेल्या मुलासारखा बनत असतो ही गोष्ट श्रीयुत उराँव यांना पटलेली आहे. येथील हजारो आदिवासी ख्रिस्ती बनले आहेत. आणि त्या धर्माबरोबर आलेल्या विचारांमुळेंच कीं काय आपल्यांतील चांगल्या प्रथा चालू ठेवण्याचीहि त्यांना लाज वाटूं लागली आहे. त्या लोपत चाललेल्या प्रथा पुनः रुजवाव्या यासाठीं श्रीयुत उराँव यांची धडपड चाललेली आहे.

या प्रथांपैकीं एक उत्कृष्ट प्रथा म्हणजे " धुमकुडिया. " अगदीं चमत्कारिक आणि न ऐकलेला शब्द आहे नाहीं हा ? चार दिवसांपूर्वी श्री. उराँव आमच्या शिबिरांत आले आणि एखाद्या दिवशीं सायंकाळीं धुमकुडिया पाहण्यासाठीं या असें निमंत्रण देऊं लागले, तेव्हां आम्हांलाहि तो शब्द मोठा गूढ वाटला. पण शब्द जितका गूढ तितकें त्याचें आकर्षण अधिक असतें नाहीं ? म्हणून आम्हीं त्यांच्या निमंत्रणाचा आनंदानें स्वीकार केला आणि काल रांचीशेजारीं आठ दहा मैलांवरच्या मांदरगांवीं तेथला धुमकुडिया पाहण्यासाठीं गेलों. आम्हीं तेथें जें पाहिलें त्यामुळें आज कांहीं तरी नवीन पाहिलें असें वाटलें आणि मन संतुष्ट होऊन गेलें.

धुमकुडिया हा शब्द कसा बनला तें नक्की सांगतां येणार नाहीं. पण धूम्रकुटि या शब्दावरून तो आल्यासारखा वाटतो खरा. धूम्रकुटि म्हणजे जेथून सतत धूर येत असतो म्हणजे जेथें सतत विस्तव पेटलेला असतो अशी कुटि किंवा झोपडी. आतां आपल्याला विस्तवाचें कांहीं महत्त्व वाटत नाहीं. काडी फरकन् ओढली कीं झाला प्रकट जाळ; बटन खटकन् दाबलें कीं फुलली विजेच्या शेगडींतली तार; अशी आजची स्थिति आहे. पण शेंकडों हजारों वर्षांपूर्वी माणसाला

अग्नि म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर वाटे. म्हणून अग्नि एकदां पेटवला कीं तो विझूं नये, सतत टिकून राहावा यासाठीं माणसें काळजी घेत. तुला आठवत असेल कीं कोंकणातली तुझी आजी अजूनसुद्धां घरांतला विस्तव कधींहि आजिबात विझूं देत नाहीं, एक तरी गोवरीचें खांड ठेवते. पार्शी लोकांच्या अग्यारींत हजारों वर्षांपासूनचा अखंड अग्नि राखून ठेवलेला असतो. आपल्या हिंदु समाजांतले अग्निहोत्री ब्राह्मण अग्निकुंडांतला अग्नि कधीं विझूं देत नाहीं. या चाली म्हणजे त्या अति प्राचीन काळाचीं स्मारकेंच होत. पार्शी समाजांतील जशी अग्यारी, हिंदु समाजांतील जसें अग्निहोत्र, तशीच या मुंडा, उराँव जमातीमधील ही धुमकुडिया. अग्नि जेव्हां मोलाचा मानला गेला, पवित्र मानला गेला, रक्षणीय मानला गेला तेव्हां त्याच्याभोंवतीं सामाजिक संस्था व रीतिभाती उभ्या राहिल्या असाव्या. पारशांमध्यें अग्निरक्षण करणारे पुरोहित निर्माण झाले. आपल्याकडे यज्ञयागादि संस्था उत्पन्न झाल्या. तशीच धुमकुडिया ही देखील आदिवासी समाजांत एक मोठी संस्था बनली असावी.

धुमकुडिया म्हणजे एक लांबलचक झोपडी असते. आंत शेकोटी पेटवलेली असते आणि पडवीमध्यें जळणाचा सांठा ठेवलेला असतो. या जमातींचा नियम असा आहे कीं गांवांतील प्रत्येक मुलानें तो सात आठ वर्षांचा झाला कीं तेव्हांपासून त्याचें लग्न होईपर्यंत दररोज रात्रीं धुमकुडियांतच निजावयास आलें पाहिजे. रिकाम्या हातानें कोणी यायचें नाहीं. प्रत्येकानें शेतावरून किंवा रानांतून धुमकुडियांत येतांना एखादा तरी लाकडाचा ओंडका अथवा बांड हातांत घेऊन यावें आणि जळणाचा पुरवठा कायम ठेवावा. धुमकुडियांतील सर्व मुलांवर

देखरेख ठेवण्यासाठीं मोठीं माणसें आळीपाळीनें नेमलेलीं असतात. त्या झोपडीमध्येंच ढोल वगैरे खेळाचें व शिकारीचें सामान ठेवलेलें असतें. तेथें रोज रात्रीं शेकोटीपाशीं जमलेल्या मुलांना मोठीं माणसें आपल्या देवादिकांचीं, सणावारांची, चालीरीतींची माहिती करून देतात. त्यांना लोकगीतें शिकवितात आणि मुख्य म्हणजे धुमकुडियाच्या लगत असलेल्या पटांगणांत मुलांमुलींना नाचाचें शिक्षण देण्यांत येतें. या पटांगणाला ‘ आखाडा ’ असें म्हणतात. धुमकुडिया आणि आखाडा हीं दोन स्थानें म्हणजे या जमातीच्या जीवनांतील शिक्षणाचीं आणि आनंदाचीं केंद्रेच होत. तीं पाहण्याचा दुर्मिळ योग श्रीयुत उराँवांच्या निमंत्रणामुळें आम्हांला लाभणार होता. मग आम्ही तो कसा चुकवूं ? म्हणून त्या दिवशीं मोठ्या उत्सुकतेनें आम्ही निघालों.

आम्ही मांडरगांवच्या वेशीवर गेलों आणि तेथपासूनच आम्हांला आदिवासींच्या भावमधुर संस्कृतीचा प्रत्यय येऊं लागला. वेशीवर आमचें स्वागत करण्यांत आलें. स्त्रियांनीं आमच्या पायांवर पाणी ओतलें, गळ्यांत फुलांचे हार घातले, आणि प्रत्येकाच्या कानावर एक एक फूल खोंवलें. अग्रभागीं ढोल वाजत आहेत, तरुण लोक नाचत गात आहेत अशा थाटांत आखाडयापर्यंत आमची मिरवणूक काढण्यांत आली. तेथें गांवकरी लोकांनींच तयार केलेल्या चटया सभोंवार टाकून आमची बसण्याची सोय केली होती. आम्ही बसतों न बसतों तों नाचाला सुरुवात झाली सुद्धा.

शुभा, तो नाच मीं कधीं विसणार नाहीं. खरें लोकनृत्य आम्हीं त्या दिवशीं पाहिलें. वर आभाळ भरून आलें होतें, अधूनमधून पावसाची सर येऊन नर्तकांना आणि प्रेक्षकांना भिजवून जात होती

आणि आखाडयांत ढोलाच्या तालावर बेहोष झालेले पुरुष आणि स्त्रिया नाचत होत्या. असें मोकळें अकृत्रिम नृत्य मीं तरी कधीं पाहिलेलें नाहीं. कोणी मुद्दाम वेषभूषा केलेली नव्हती कीं अंगाला अथवा तोंडाला रंग लावलेला नव्हता. नाचणाऱ्यांचा खास गट वेगळा आणि बाकीचे गांवकरी नुसते बघ्ये प्रेक्षक असाहि प्रकार तेथें नव्हता. सारा गांवच नाचत होता. त्यांत तरुण नाचत होते, अविवाहित तरुणी नाचत होत्या. कर्ते पुरुष नाचत होते आणि पाठीवर मुलें बांधलेल्या गृहिणी नाचत होत्या. ढोलावर टिपरूं पडल्याबरोबर झोपडी-झोपडींतून हसतमुख स्त्रिया व पुरुष भराभर बाहेर आले आणि नाचांत सामील झाले. झुरमुळ्या पडून सारें अंग सुरकुतून गेलेली एक वृद्ध स्त्री डाव्या हातांत नातवंडाचा हात घेऊन जेव्हां साऱ्या जणींच्या बरोबर नाचूं लागली तेव्हां माझ्या डोळ्यांत तर आनंदाश्रु उभे राहिले !

माझें रक्त त्या नाचाच्या तालावर नाचूं लागलें आणि शरीरांतून कसल्या तरी तालबद्ध लहरी दौडूं लागल्या. वाटलें सगळें चराचर नाचतें आहे मग आपण कां न नाचा ! उठावें आणि आपणहि नाचूं लागावें ! असा तो नाच होता. सहजस्फूर्त आणि वेडावणारा नाच. आकाशांत मेघ गडगडूं लागले कीं मोर कसा नाचतो ? चंद्रोदय झाल्याबरोबर समुद्राच्या लाटा कशा फेसाळून किनाऱ्याकडून झेपावूं लागतात ? दरडीमधून गुणगुणत आणि तृणवेलींशीं रमतगमत झरा कसा मोकळ्या अंगानें गिरक्या घेत घेत वाहत असतो ? मोरामध्यें जी उत्स्फूर्तता आहे, सागराच्या लाटांमध्यें जी उचंबळून येणारी अधीरता आहे, निर्झरामध्यें जो बेभानपणा आहे तो या नाचांत मला दिसला.

आखाडयांतलीं तीं पन्नास पाऊणशें माणसें सतत दोन तास मोरासारखीं झुलत डुलत होतीं, लाटासारखीं हेलावत नि उचंबळत होतीं, निर्झरासारखीं स्वतःच्याच मस्तींत गात गिरगिरत होतीं. त्यांना ना थकवा ना कंटाळा. श्रीयुत उराँव म्हणाले कीं, " शेतांतलें कामधाम आटोपून आमचे लोक आखाडयांत जमले कीं रात्र रात्र नाचतात आणि तांबडें फुटलें कीं पुन्हा शेतावर जातात. त्यांना थकवा येत नाहीं. नाच सुरू झाला कीं सारें जग ते विसरतात." त्यांच्या बोलण्यांत मला तरी अतिशयोक्ति भासली नाहीं.

अंधार पडूं लागला तसे आम्ही उठलों. नाच थांबला. गांवकऱ्यांनीं प्रेमानें आम्हांला निरोप दिला आणि संतुष्ट मनानें आम्ही शिबिराकडे परतलों. मला वाटलें कीं अशा सहजीवनाच्या आनंदाला आम्ही मात्र पारखे झालों आहों. आपल्या राहणीमधून तो सहजपणा नाहींसा झालेला आहे. आमच्या सामाजिक जीवनांत आतां एकहि काम, एकहि खेळ किंवा एकहि समारंभ असा राहिलेला नाहीं कीं ज्यांत झाडून सारे लोक, वृद्ध व तरुण, स्त्रिया व पुरुष एकत्र जमतील, स्वतःला विसरून जातील आणि आनंद लुटतील. सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्विनावधीतमस्तु । मा विद्विषावहै । हें सूक्त म्हणजे आपल्या बाबतींत एक केवळ निर्जीव असा मंत्र बनला आहे.

शुभा, आपणां भारतामधील लोकांची दशा एखाद्या म्हाताऱ्या, जगाला विटलेल्या, मरगळून गेलेल्या माणसासारखी झालेली आहे. बेहोष होणें, आनंदानें उसळणें, नाचणें, गाणें आणि त्या वेळीं सारा औपचारिकपणा विसरून जाणें या गोष्टी जणूं कांहीं आपल्याला

जमतच नाहींत. त्यामुळें आपण अति सोंवळेपणा तरी करतो नाहीं तर अति बीभत्सपणा तरी करतों ! निकोप खेळीमेळीचें, सरमिसळ जीवन आपल्याला त्यामुळें साधतच नाहीं. स्त्रिया व पुरुष एकत्र नाचलीं तर मग जग बुडेल असें आपणांस वाटतें. आजोबा आणि नातू एकत्र बागडले तर सगळा शिष्टाचार संपुष्टांत आला अशी आम्हीं कल्पना करून घेतलेली आहे. आजच्या आपल्या जीवनांतला हा दगडी शुष्कपणा जर नाहींसा होईल, त्यामध्यें जर थोडी अधिक क्रीडेची टवटवी आणि आनंदाचा रस उतरेल तर फार बरें होईल असें मला वाटतें.

खेदाची गोष्ट अशी आहे कीं आमचें जीवन जेव्हां केव्हां अधिक आनंददायी बनावयाचें असेल तें बनो; पण सध्यां मात्र या आदिवासी लोकांवर आम्हां " सुधारलेल्या " लोकांच्या रसहीन जीवनाची छाप पडून त्यांच्यामधली ही सहजीवनाची भावना लुप्त होऊं लागली आहे. म्हणून या जमातींना नवीन जगाच्या प्रवाहामध्यें आणून सोडीत असतांना त्यांच्या जीवनांतील आनंद व ऐक्य धुमकुडियाच्या द्वारां व आखाडयाच्या द्वारां कायम ठेवण्यासाठीं आपण प्रयत्न करीत आहों असें जेव्हां श्री. थेब्ले उराँव यांनीं सांगितलें तेव्हां मी मनांतच पण मनापासून म्हटलें, " तथास्तु ! "

तुझा

**नाना**

रांची ( छोटा नागपूर ) ४।७।५१

## ८ : प्रवासांतील नेत्रोत्सव

प्रिय शुभा,

कसालमधील एका दुकानाच्या पडवींतल्या बाकड्यावर बसून मी हें पत्र लिहीत आहें.मला सायंकाळीं कणकवलीला पोंचावयास हवें.पण मालवणाहून कणकवलीला जाणारी मोटार वेळेवर आली तरी तासाच्या आधीं ती येथें येण्याचा संभव नाहीं. कामाच्या दृष्टीनें आजचा सबंध दिवस जवळ जवळ फुकट गेल्यामुळें गेले दीड दोन महिने सतत प्रवासापायीं शिणलेल्या माझ्या शरीराला आणि मनाला अधिकच शिणल्यासारखें वाटत आहे. आजूबाजूला माझ्या ओळखीचे कोणी नाहीं. तेथून दोन तीन मैलांवर असलेल्या सुकळवाडच्या बाजारासाठीं गेलेलीं बायकामाणसें आतां एक एक दोन दोन अशीं परतत आहेत. संध्याकाळचें कललेलें ऊन आतां कसें विसविशीत आणि निःसत्त्व दिसतें आहे. रस्त्यावरची, हॉटेलांतली आणि दुकानांतली रहदारी विरळ होत चालली आहे. विड्या बांधण्यासाठीं सकाळीं खरेदी करून उन्हांत ठेवलेले कुड्यांच्या पानांचे पुडे दुकानदार आतां

नीट डाळून[1] ठेवीत आहेत आणि नुकत्याच सावंतवाडीकडे गेलेल्या बसनें उडवलेली तांबडी धूळ हळू हळू खालीं बसत चालली आहे.

प्रवासाचा मला केव्हां केव्हां मनस्वी कंटाळा येतो. त्यापैकींच ही आतांची वेळ आहे. गेल्या दोन तीन महिन्यांतलें माझें घरीं येणें पट् पट् सावलीच्या खेळांतल्याप्रमाणें झालेलें होतें. कोठून तरी घाईघाईनें यावयाचें, जरा घरांत डोकावायचें, प्रवासांत मळलेले कपडे भट्टीसाठीं काढून ठेवायचे, धुतलेले कपडे पिशवींत कोंबायचे कीं पुन्हा जाऊन बसला टांग्यांत. 'तुझं हें फिरणं पाहून बघणाराला वीट येतो, पण तुला कसा बाबा कंटाळा येत नाहीं, देव जाणे ?' असें आई तर उघडच बोलून दाखवते. सुमतीला आणि तुलासुद्धां मनांतून असाच शेरा मारावयाचा असावा, पण संकोचामुळें तुम्ही तो बोलून दाखवीत नसाल इतकेंच.

मला कंटाळा येत नाहीं असें का तुम्हांला वाटतें ? मलासुद्धा वाटतं कीं काय हें आयुष्य ! सारखी आपली धांदल आणि धावपळ. कृष्णपक्षाच्या काळोख्या रात्री सुरू झाल्या आणि चंद्रकळेवरच्या खडीप्रमाणें ठसठशीत आणि चमकदार दिसणारीं ग्रहनक्षत्रें दिसूं लागलीं म्हणजे मनांत येतें कीं त्यांची तुला ओळख करून द्यावी. शुक्लपक्षांतील चांदणें पाहिलें कीं आपल्या सज्जांतील बचक्याएवढाले कुंदाचे गेंद आठवतात आणि वाटतें कीं तुला जवळ बसवून

'या कुन्देन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता
या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ।'

या सरस्वतीस्तवनाचा अर्थ तुला समजावून सांगावा. संध्या-काळच्या सोन्यामध्यें दऱ्याखोरीं न्हाऊन निघालीं म्हणजे इच्छा होते कीं

---

१. डाळणें = एकावर एक नीट रचणें.

गच्चीवर जावें आणि पर्वतीचे कळस मावळत्या सूर्यकिरणांत चमकत असल्याचें आणि वरच्या निळ्या आकाशांतल्या तुरळक ढगांवर गुलाबी झूब पसरल्याचें जें चित्र रंगवायला तूं इतके दिवस सांगत आहेस तें रेखाटण्यास सुरुवात करावी. पुण्याकडचीं वर्तमानपत्रें चाळलीं आणि पुण्यास शेक्सपियरच्या नाटकांचे प्रयोग सुरू असल्याची जाहिरात वाचली कीं मनांत विचार येतो कीं असेंच तडक पुण्यास जावें आणि तुझ्या व सुमतीच्या समवेत त्या महान् नाटककाराच्या एकातरी नाट्यकृतीचा आनंद लुटावा. पण हें जमावें कसें ? मग ही धावपळ कोण करील ? आणि ही न करून चालणार आहे का ?

तथापि प्रवासांत एकसारखें दगदगीचें नि गडबडीचें वाळवंटच तुडवीत जावयाचें असतें अशी जर तूं आपली समजूत करून घेतलीस तर तें मात्र चुकीचें होईल. या वाळवंटांत सौजन्याचे व आतिथ्याचे असे कांहीं सुवर्णकण जागजागीं आढळून येतात कीं माणसाचा ऊर कृतज्ञतेनें भरून येतो; असे कांहीं बावनकशी निष्ठेचे कार्यकर्ते भेटतात कीं त्यांच्याकडे पाहून किरकोळ अडचणींविषयीं कुरकुर करणाऱ्या आपल्या मनाची आपणासच लाज वाटूं लागते; आणि अधून मधून अशीं कांहीं निसर्गदृश्यें नजरेसमोर उभीं ठाकतात कीं त्यांच्या दर्शना-बरोबर सारा शीण दूर होतो आणि त्यांचा ठसा स्मृतिपटावर उमटतो तो कायमचा.

माझ्या प्रवासांतला एक प्रसंग आठवला. त्या दिवशीं सकाळीं नंदुरबारहून आम्ही तळोद्याला निघालों होतों. आमची मोटार गचके खात, आचके देत चालली होती. आदल्या रात्रीं नंदुरबारच्या मित्रांनीं आमच्यावर रागावून आधीं ठरलेल्या दोन्ही सभा न घेतल्यामुळें मीहि

त्यांच्यावर रागावलों होतों. नंदुरबारच्या हेलपाटयामध्यें वेळ फुकट गेला होता, पैसा फुकट गेला होता आणि शेवटपर्यंत नंदुरबारकरांची समजूत घालतां न आल्यामुळें माझा युक्तिवादहि फुकट गेला होता. अशा वेळीं मन असें कांहीं मरगळून जातें कीं पुसूं नकोस. आदल्या दिवशींचा अनुभव हा असा असल्याकारणानें आजचे कार्यक्रमसुद्धां असेच फिसकटणार कीं काय, अशी शंका मनांत डोकावत होतीच. अशा वेळीं गाडी जर वेगानें जात असली तर मनाला जरा विरंगुळा तरी मिळतो. गाडीबरोबर मनहि जणूं वेगांत येतें, आणि त्याच्या वरचा विषण्णतेचा चिखल बाजूला फेकला जातो कीं काय कोण जाणे! कारण कांहींहि असो, वेगवान् वाहनांत बसलें कीं माझ्या मनाला हुषारी वाटते खरी. पण हा रस्ता तर असा होता कीं आमची गाडी पावलो-पावलीं ठेचकळत होतीं आणि त्या हेंदकळ्यामुळें मनांतलें गदळ खालीं बसण्याऐवजीं ढवळून वरच येत होतें. तासाभरानें रस्ता संपला गाडी एकदाची उतरणीला लागली. मी उदासपणें बाहेर दृष्टि टाकली तों समोर तापीचा निळा प्रवाह, दोन्ही बाजूला पसरलेलें अफाट वाळवंट समोरच्या किनाऱ्यावर चमकणारीं चिरेबंदी देवळें आणि वाडे. सकाळच्या उन्हांत तो सगळा देखावा असा कांहीं स्पष्ट, स्वच्छ आणि नेटका दिसत होता म्हणतेस! मीं शिवाजी पाटलाला विचारलें "कोणतें गांव रे?" तो म्हणाला "प्रकाशं!"

"प्रकाशं!" तें नांव ऐकून तर मी हरखून गेलों. इतकें अपूर्व पण यथार्थ नांव मीं कधीं ऐकलेलें नव्हतें. तें नांव ऐकल्यावर तें गांव मला अधिकच मनोरम भासूं लागलें! या माझ्या बोलण्याचें तुला हसूं येईल. तूं म्हणशील नांवामुळें सौंदर्य वाढतें कीं काय? तूं जरा मोठी झालीस,

कीं शेक्सपिअरच्या याच अर्थाच्या पुढील ओळी तुझ्या बहुधा वाचनांत येतील.

What is in a name?
That which we call a rose,
By any other name shall smell as sweet.

शेक्सपिअर प्रश्न करीत आहे कीं नांवांत काय एवढें ठेवलेलें आहे? ज्याला आपण गुलाब म्हणतों त्याला दुसरें एखादें नांव ठेवलें तरी त्याचा सुगंध कांहीं कमी कां होणार आहे? प्रश्न वरकरणीं ठीक वाटतो. पण सुंदर गुणांना सुंदर रूपाची, सुंदर वेषाची, आणि तशीच सुंदर नांवाची जर जोड मिळाली तर ते गुण अधिक उठून नाहीं कां दिसत? समोर तापीचा विमल व समृद्ध प्रवाह, दोन्ही तीरांवर विस्तीर्ण वाळवंटें, किनाऱ्यावरच्या कातळावर बद्रीनाथाचें देऊळ, आणि चिरेबंदी वाडे असलेल्या या गांवाचें नांव जर वाळुंज अथवा परतुड असें कांहीं तरी असतें तर काय झालें असतें? "आहे, स्थळ रम्य आहे" इतकें म्हणून आपण पुढें सरलों असतों. पण गांवाचें नांव "प्रकाशें" आहे हें ऐकल्यावर गुण आणि नांव यांची अशी कांहीं बेमालूम जुळणी झाली कीं तो सारा देखावा माझ्या आठवणींत कोरला गेला!

नांवाचीच गोष्ट निघाली म्हणून मी पुन्हा एकवार निक्षून सांगतों कीं नांवांत कांहीं अर्थ नाहीं ही गोष्ट मला मान्य नाहीं. कारण नांवामुळें मनांत भाव निर्माण होतात. कांहीं नांवें भारदस्त वाटतात, वजनदार वाटतात. प्रभानवल्ली, विशाखापट्टण, ओंकारमांधाता ही गांवांचीं नांवें मनांत उच्चारून पाहा बरें. तीं कशीं प्रतिष्ठित वाटतात, नाहीं?

तशींच अलकनंदा,हिरण्यकेशी ही नद्यांचीं नांवें ऐकलीं म्हणजे भरजरी शाल नेसून नाकांत लफ्फेदार नथ :घातलेली घवघवीत शरीराची एखादी सुवासिनी समोर उभी राहिल्यासारखें वाटतें कीं नाहीं, सांग !

प्रकाश हें नांव तसें प्रौढ नाहीं. सगळींच नांवें प्रौढ कशीं असतील ? पण एखादें चिमुकलें, चुणचुणीत नीटस मूल असावें तसें तें आहे. कोंकणांत एक गांव आहे त्याचें नांव ' श्रावण. ' कर्जत-वरून जी नदी जाते तिचें नांव आहे ' उल्हास. ' मालवणपाशीं एक ओढा आहे त्याला म्हणतात ' आनंदवहाळ ! ' हीं नांवें ऐकल्याबरोबर मन कसें उल्हसित होतें ! एकादें गोजिरवाणें मूल अंगाला येऊन बिलगावें तसें वाटतें. कांहीं नांवें अशीं असतात कीं त्यांच्या-भोंवतीं एक प्रकारचें गूढरम्य वातावरण पसरलेलें असतें. राधानगरीहून कोल्हापूरकडे येऊं लागलें कीं मध्येंच घाटांत एक गांव लागतें त्याचें नांव ' वाकीघोल. ' मला हें नांव मोठें गूढरम्य वाटतें. लांजे महलां-तील कातळकडा व पश्चिमखानदेशमधलें तोरणमाळ या नांवांत सुद्धां कशा गूढ छटा उमटलेल्या आहेत पाहा.

असो. नांवांचें हें पुराण बरेंच लांबलें. माझा मुद्दा एवढाच होता कीं वस्तूंच्या अथवा स्थळांच्या अंगचे गुण अधिक ठळक किंवा मंद करण्याची शक्ति नांवामध्यें खासच आहे. नांवाचें महत्त्व क्षुद्र समजून चालणार नाहीं. जे आईबाप आपल्या मुलांचीं नांवें फेगडू, धोंडू, तोताराम, ठकू, ठमा अशीं ठेवतात त्यांच्या मनोवृत्तीची कल्पनाच मला करतां येत नाहीं.

प्रकाश हें नांव आणि गांव जसें माझ्या मनावर ठसलें तशींच या दौऱ्यामधलीं आणखीहि कांहीं स्थळें माझ्या स्मरणवहींत कायमचीं

प्रविष्ट झालीं. त्यांपैकीं दोन स्थळें तर अशीं आहेत कीं जीं पुन्हा पुन्हा पाहावींत, इतरांना नेऊन दाखवावींत आणि आपल्या आनंदांत आपल्या इष्ट–मित्रांनाहि सहभागी करून घ्यावें अशी इच्छा मनाला होते.

एकदा रत्नागिरींची खाडी–साखरतरी-ओलांडून आम्ही काळबा-देवीला रात्रीच्या सभेसाठीं जात होतों. सुमारें दहाची वेळ होती. रात्र अंधारी होती. वर आभाळांत असंख्य तारे पारिजातकाच्या फुलांसारखे फुलले होते. खालच्या पुळणीचा·( वाळू ) मऊ निसटता स्पर्श पायांना होत होता. भरतीची वेळ होती. लाटांमागून लाटा उठत होत्या, एकमेकींवर लोळत होत्या, फेंसाळत होत्या, किनाऱ्यावर येऊन फुटत होत्या, आणि हसत हसत परत जात होत्या. मीं लाटांकडे पाहिलें आणि शुभा, मी स्तिमित होऊन गेलों. फेंसाळणारा समुद्र मी कांहीं पहिल्यांदाच पाहात नव्हतों. आतांपर्यंत भरतीच्या लाटा मीं शेंकडों वेळां पाहिलेल्या आहेत. पण गडद काळोख्या रात्रीं लाटा किनाऱ्यावर येतांना इतक्या विलक्षण तेजानें चमकतात हें मात्र माझ्या प्रथमच लक्षांत येत होतें. एकामागून एक अशा येणाऱ्या त्या लाटा मस्तकीं जणूं हिऱ्यामोत्यांच्या बिंद्या घालून येत आहेत आणि किनाऱ्यावर रत्नांचा चूर उधळून माघाऱ्या जात आहेत असें मला वाटलें. तो गडद अंधार, उंडलीच्या फुलांच्या वासानें भरलेलें तें वातावरण, नक्षत्रांची पखरण पडलेलें तें आकाशांगण आणि रत्नखचित कमरपट्ट्यासारखी झळाळणारी व झणकारणारी ती वेळा[१] ! वेडावून टाकणारें होतें तें

---

१. वेळा = समुद्रकिनारा.

दृश्य. मीं मनांत म्हटलें, " रात्रभर इथेंच बसून राहावें; अगदी हलूं नये इथून. उडत गेली ती सभा, तीं भाषणें आणि ती निवडणूक !"

मनाला गुंगी आणणारें असेंच दुसरें स्थळ म्हणजे वेंगुर्ल्याचा डाक बंगला. कोण्या रसिक इंजिनियरानें ही जागा शोधून काढली असेल त्याला मनःपूर्वक धन्यवाद दिले पाहिजेत. उघडया समुद्रांत पाय सोडून बसलेल्या एका टेकाडावर हा बंगला बांधलेला आहे. बंगल्याच्या सज्जांत उभे राहिलें कीं उजवीकडे निवतीच्या बत्तीपासून तेरेखोलच्या खाडीपर्यंतचा किनारा दृष्टीच्या टप्प्यांत येतो. सरळ पश्चिमेकडे तोंड वळवावें तों अथांग आणि अपार सागर पसरलेला दिसतो. या सागराच्या आरशांत लाजऱ्या उषेचीं, चंडांशु सूर्यनारायणाचीं, शिणलेल्या संध्येचीं, रंगेल चंद्रम्याचीं, जीं विविध रूपें उमटतात त्यांचें वर्णन करण्यास शब्द तोकडे आहेत. पहाटेच्या धुक्यांतून निवतीवरच्या दिवादांडीला वळसा घालून मालवणकडची बोट जेव्हां वेंगुर्ल्याच्या बंदराकडे संथपणें येऊं लागते तेव्हां तर दिव्यांनीं उजळून निघालेली ती बोट म्हणजे स्वप्नांतील एक परीच आहे कीं काय असा भास होतो. ऐन दुपारीं सूर्य आपल्या समग्र तेजानें तळपूं लागल्यावर सागराला जें शांत नील-गंभीर स्वरूप प्राप्त होतें त्याच्याकडे पाहून माझी छाती दडपून जाते. भर दोन प्रहरीं समुद्राला प्राप्त होणाऱ्या त्या निळ्या रंगांत मनाला कांपरें भरवणारें सामर्थ्य असतें, डोळे दिपवणारें तेज असतें, वाणीला मुकी करणारें गांभीर्य असतें. रामाचें वर्णन करतांना ' समुद्र इव गांभीर्ये ' असें जें म्हटलें आहे त्याची यथार्थता अशा वेळीं चांगली लक्षांत येते.

पण या ठिकाणची खरी मजा आहे ती टेकडीच्या पायथ्याशीं असलेल्या हत्तींच्या अंगासारख्या अजस्र शिळांशीं लाटांची जी दंगामस्ती अहोरात्र चालू असते ती पाहण्यांत. अवखळपणा पाहायचा असेल तर तो येथें पाहावा. मस्ती पाहावयाची असेल तर येथें यावें, आणि अचलपणा पाहावयाचा असेल तरीहि येथेंच यावें. आज शेंकडों वर्षें हे स्थितप्रज्ञ पाषाण जसेच्या तसे उभे आहेत आणि या लाटा त्यांच्यावर धावून येत आहेत, त्यांच्या भोंवतीं गिरगिरत नाचत आहेत, त्यांना धक्का देत आहे, त्यांना बिलगत आहेत, त्यांना कुरवाळीत आहेत, त्यांना तुडवीत आहेत, त्यांच्यावर गरजत आहेत, त्यांच्या कानाशीं गुणगुणत आहेत. असा खेळ अहोरात्र चाललेला असतो. पाहणाराचे डोळे शिणतात पण त्या लाटा शिणत नाहींत; हे पाषाण शिणत नाहींत. हें अखंड चाललेलें तांडवनृत्य पाहून दृष्टि दमली कीं पाठमोरे पाहावें, म्हणजे सोज्वळ शांत बंदर, त्यांत नांगर टाकून उभ्या असलेल्या फतेमाऱ्या, [१] आणि त्यांच्या मधून सुरकांड्या मारीत लहान मुलासारख्या वागडणाऱ्या होड्या. पलीकडे पांढरी शुभ्र पुळण, माडांचीं मोर्चेलें आणि वेंगुर्ल्यांतील घरें, वाड्या दृष्टीस पडतील. चिमुकलें बंदर आणि अपार सागर, प्रक्षुब्ध लाटा आणि निश्चल पाषाण, हंसासारखे पंख पसरून मंदगतीनें चाललेलीं गलबतें आणि मासोळ्याप्रमाणें सुरसुरणाऱ्या होड्या यांचें एकदम दर्शन घडवणारा हा पांथाराम एकदां समक्ष येऊन तूं पाहाच.

शुभा, पत्र कोठें सुरू केलें आणि कोठें संपवलें! आतां मात्र आणखी लिहीत नाहीं. नाहीं तर वेंगुर्ल्याच्या बंदरांतून निघालेले

---

१. फतेमारी – मोठें मालवाहू गलबत.

आमचें हें तारूं पृथ्वीपर्यटनालाच निघायचें एखाद वेळीं ! म्हणून पुरें करतों. पत्राचें तात्पर्य तुझ्या लक्षांत आलेंच असेल. प्रवास हा गाभुळलेल्या चिंचेसारखा आहे. दांत आंबतात पण बोटुक हातांतून फेकून द्यावेसें वाटत नाहीं !

तुझा

**नाना**

कसाल, १५-१२-५१

## ९ : हिरवे सोयरे

**प्रिय शुभा,**

तुझें २५।१ चें पुण्याहून पाठविलेलें पत्र मिळालें. तुझी परीक्षा आतां आलीच कीं! अभ्यासाचें अगदीं अजीर्ण व्हायला आलें असेल, खरें ना ? तूं लिहिलेंच आहेस कीं "संध्याकाळीं पुस्तक उघडवत नाहीं नि दुसरं काय करावं तेंहि सुचत नाहीं." मला वाटतें कीं परीक्षेच्या जरा आधी सगळ्याच विद्यार्थ्यांची मनःस्थिति अशी बेचैन होत असावी. त्या वेळीं अभ्यास करायचा म्हणजे वाचलेलेंच पुन्हा वाचायचें आणि समजलेलें पुन्हा समजून घ्यावयाचें असा अभ्यासाचा अर्थ होऊन बसतो. त्यामुळें शेवटीं शेवटीं त्याचा इतका कंटाळा येतो कीं पुस्तकें नजरेसमोर नकोतशीं वाटूं लागतात. वाटतें कीं पास किंवा नापास, जें कांहीं व्हायचें असेल तें होवो, पण परीक्षा संपून हीं पुस्तकें एकदांचीं कपाटांत जाऊन बसूं देत ! शुभा, मला आठवतें कीं परीक्षेंतल्या एकेका विषयाची प्रश्नपत्रिका लिहून घरीं आल्याबरोबर जें पहिलें काम मी करी तें म्हणजे त्या विषयाचीं सगळीं पुस्तकें आणि

वह्या कपाटांत कोंबणें. टेबलावरच्या एकेका लठ्ठंभारती ग्रंथाची उचल-बांगडी करतांना, घरामध्यें नको होईपर्यंत तळ ठोकून बसलेल्या एकेका पाहुण्याला टांग्यांत बसवून देतांना जेवढा आणि जसा आनंद होतो अगदीं तेवढा आणि तस्सा आनंद मला व्हायचा !

पण ही झाली परीक्षा आटोपल्यानंतरची म्हणजे लांबची गोष्ट. तोपर्यंत मनावर चढलेली ही कंटाळ्याची बुरशी काढून टाकायची कशी ? नेहमींचें काम करकरून मन कंटाळून गेलेलें असलें म्हणजे मनाला विरंगुळा वाटण्यासाठीं काय करावें, असें जर मला कोणी विचारलें तर मी बिनदिक्कत सुचवीन कीं हातांत खुरपें, कुदळ किंवा झारी घेऊन बागेंत जा, घटका दोन घटका तेथें काम करा नि मग मनाला आलेला शीण कोठच्या कोठें पळून जातो कीं नाहीं तें मला सांगा. पावसाळ्यामध्यें बासनांत पडून कुबट झालेलीं वस्त्रेंप्रावरणें चित्रांच्या उन्हांत खडखडीत तापल्यावर पुन्हा कशीं चुरचुरीत होतात ! बागकामामुळें आपलें मन तसेंच ताजें होतें. हें माझें नुसतें मत नाहीं, तर अनुभव आहे. एकाच कामासाठीं फार वेळ वापरल्याकारणानें मनाला पडलेल्या सुरकुत्या जर साफ करायच्या असतील आणि मनाला येऊं लागलेली कुबटाण जर घालवायची असेल तर बागकामासारखा दुसरा रामबाण उपाय नाहीं.

कोणी म्हणतील कीं अशा कंटाळयाच्या वेळीं चित्रपट पाहावा, किंवा रेडिओ सुरू करून संगीत ऐकत बसावें किंवा नदीकांठीं जाऊन पाण्यांत पाय सोडून स्वस्थ बसून राहावें. आहे, या सूचनां-तहि थोडाफार अर्थ आहे. कारण पटकथेंतल्या भूमिकांशीं आपण समरस झालों कीं तादात्म्य पावलेलें आपलें मन स्वतःला विसरतें.

संगीताला तर समर्थांनीं 'धन्य ते गायनी कळा' असें शिफारसपत्र तीनशें वर्षांपूर्वींच देऊन ठेवलेलें आहे. तेव्हां संगीताच्या स्वरलहरी कानावरून जाऊं लागल्या कीं त्या आपल्या मनाचा शिणवटा धुवून नेतील यांत शंका नाहीं. किंवा संध्याकाळच्या शांत वेळीं अंग थरकवीत पुढें वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहांत आपण पाय सोडून बसलों आणि पाण्यांतल्या मासोळ्या आपल्या पायांच्या बोटांना मऊ मऊ चावे घेऊं लागल्या कीं मनाला भोंवतालच्या जगाचा विसर पडतो हें कोण नाकबूल करील ? पण हे सर्व उपाय आपापल्यापरी जरी चांगले तरी त्यांत आपली भूमिका एका प्रकारें बध्याचीच असते. फोटोची कांच जशी स्वतः स्वस्थ राहून बाह्य दृश्यांचे ठसे स्वतःवर उमटूं देते तशीच कांहींशी ही भूमिका झाली. पण बागकामाचें कसें आहे पाहा. त्यांत आपल्याला बध्याची भूमिका मुळींच घ्यावी लागत नाहीं. तेथें मन कर्तेपणानें वावरूं शकतें. बागकाम करतांना हातां-तल्या खुरप्याप्रमाणेंच आपलें मन सतत क्रियाशील राहतें आणि तण व माती खुरपतांना स्वतः खुरपें जसें अधिक टोकदार आणि धारदार बनत जातें तसें आपलें मनहि बागकाम करतां करतां अधिक टोकदार आणि धारदार बनतें. थोडक्यांत म्हणजे मनाचा कंटाळा घालविण्या-साठीं कोणत्या प्रकारची उपाययोजना करावी, सक्रिय आनंदाची कीं तटस्थ आनंदाची असा हा प्रश्न आहे. आणि मला जर माझें मत विचारशील तर मी सक्रिय आनंदाची भूमिका केव्हांहि अधिक पसंत करीन.

पण बागकाम करावें असें मीं म्हटल्याबरोबर तुझ्याकडून काय आक्षेप येईल याची मला बरोबर कल्पना आहे ! तूं म्हणणार कीं

" बागकाम करावं म्हणायला काय जातं ? पण बाग आणायची कुठून ? " परंतु या तुझ्या अडचणींत कांहीं राम नाहीं; कारण बागकामासाठीं कांहीं मुंबईच्या मलबार हिलवरील झुलत्या उद्यानासारखी ( हँगिंग गार्डन ) अथवा संभाजी उद्यानासारखी पांच दहा एकर जागा नको. दहा फूट लांब आणि दहा फूट रुंदीचा जमिनीचा तुकडा पुरेल. किंवा पांच दहा कुंड्या किंवा डबे–हो डबे !–सुद्धां बस होतील. एका कुंडींत गुलाब, एका कुंडींत निशिगंध, एका कुंडींत मोतिया, एका कुंडींत व्हायोलेट[१] अशीं चार पांच प्रकारचीं कलमें लावून तीं वाढविणें म्हणजे पांच लहान मुलांची निगा राखण्याइतकें कठिण काम आहे. पण तितकेंच तें आनंददायीहि आहे !

मी लहान होतों तेव्हां आमचें बिऱ्हाड शनिवार पेठेंत असे. तेथें पत्र्यावर रॉकेलच्या तोंड कापलेल्या डब्यांत मीं एक मोगरीचें कलम कोठून तरी मिळवून लावलें होतें. हातभर उंचीच्या त्या रोपट्यावर पहिली कळी मोहरली तेव्हांपासून ती फुलेपर्यंत मी रोज दहादां त्या कुंडीपाशीं जाऊन येई. मुगाच्या दाण्याएवढी आणि पोपटी रंगाची ती कळी वाढतां वाढतां टपोर वाटोळी झाली; तकतकीत पांढरी दिसूं लागली; उत्कट आतुर भासूं लागली. आई म्हणाली, ' आज ती फुलणार हो बहुतकरून. ' संध्याकाळीं सहाच्या सुमाराला कळीच्या मुंडींतली एक पाकळी जरा बाजूला झाली. अमळशानें दुसरी पाकळी, मग तिसरी. सुगंधी पेटीचा एक एक खणच जणूं उघडत चालला होता. मी कुंडीशेजारीं बसून राहिलों. निरुपाय म्हणून जेवायला

१ व्हायोलेट = निळया रंगाचें, सुगंधी विलायती फूल.

खालीं जाऊन वर परत येतों तेवढ्यांत तो चमत्कार पूर्ण झाला होता. कळीचीं सारीं दलें साफ उघडलीं होतीं. मोगरी फुलली होती! रात्रीच्या अंधारांत पांढरें शुभ्र आणि घसघशीत दिसणारें तें फूल पाहिल्यावर आणि त्याचा मनाला वेडावून टाकणारा वास घेतल्यावर मला जें कांहीं वाटलें त्याचें वर्णन मी कसें करूं? मीं लावलेल्या झाडाचें तें फूल म्हणून माझ्या आनंदांत अभिमानाची साखर पडली होती ती वेगळीच.

मोगऱ्याप्रमाणेंच निशिगंधाचें झाडहि लावायला सोपें. शिवाय तें दिसायलासुद्धां सुंदर. रोप पूर्ण वाढून त्याच्या दांड्यावर एका पाठो-पाठ फुलें फुलूं लागलीं कीं रोज रात्रीं नवा आनंद घ्यावा. आणि निशिगंधाचें फूल असतें तरी किती डौलदार! हिरव्यागार छडीवर हारीनें टोकापर्यंत लागत गेलेलीं त्याचीं फुलें पाहिलीं म्हणजे निशि-गंधाला गुल–छडी असें दुसरें नांव कां पडलें आहे तें सहज लक्षांत येतें. पण मोगरा काय किंवा निशिगंध काय, स्वभावानें ते लाजाळू नाहींत. आपला रंग, आपला गंध, आपला डौल ते लपवीत नाहींत. निशिगंध तर आपलें सारें वैभव चवड्यावर उभा राहून जगाला दाख-वीत असतो. पण व्हायोलेट मुलुखाचें लाजाळू. नाहीं तर व्हायोलेटचें फूल, त्याचा रंग, रूप, सुवास या सर्वच दृष्टीनें इतकें आगळें असतें कीं तें जगांत जरी थोडेंफार मिरवलें तरी त्याला नांव ठेवतां येणार नाहीं. पण तें बिचारें इतकें भिडस्त कीं पानांच्या अवगुंठनांतून जरासें कोठे बाहेर डोकावलें तरी खूप झालें म्हणायचें!

मोगरा, निशिगंध, व्हायोलेट हीं जशीं सुगंधी फुलें तसाच गुलाब. पण या स्वारीचा रुबाब कांहीं औरच असतो. गुलाबासारखें सोपस्कार

करून घेणारें झाड मीं तर पाहिलेंच नाहीं. तूं गुलाबाचें कलम लावून पाहा आणि लावणीपासून तें फुलेपर्यंत केवढी यातायात करावी लागते तें मला सांग. गुलाबाला वाटेल ती जागा चालणार नाहीं, पाणी कमी झालें तरी त्याला सोसणार नाहीं नि आधिक झालें तरीहि सोसणार नाहीं. त्याला खत वेळच्या वेळीं मिळालें पाहिजे, मुळें मोकळीं झालीं पाहिजेत, हंगाम सांधून छाटणी केली पाहिजे, कीड टिपून मारली पाहिजे. एवढें सगळें करावें तेव्हां हे राजेश्री फुलणार. इंग्रजीमध्यें गुलाबाला पुष्पराणी ( क्वीन ऑफ फ्लॉवर्स ) म्हणतात, तें अगदी यथार्थ आहे. पण एवढी मिजास संभाळल्यावर एकदां का गुलाब प्रसन्नपणानें फुलूं लागला कीं केलेले सगळे श्रम मनुष्य विसरून जातो, नव्हे त्याचे सारे श्रम भरून येतात. गुलाबाच्या फुलाची ऐट काय वर्णावी ? किती त्याचे आकार, किती रंग, किती गंध ! त्यांना सीमा नाहीं. १९४९ सालीं आम्ही मित्रमंडळी पंधरा दिवस महाबळेश्वरला शिबिर करून राहिलों होतों. त्या वेळीं तेथला एक मित्र मोठ्या प्रेमानें जयप्रकाश नारायणांना रोज ताज्या गुलाबांचा गुच्छ आणून द्यावयाचा. तो गुच्छ खोलींत ठेवला म्हणजे मला असें वाटावयाचें कीं त्याच्यापुढें आम्ही माणसें किती क्षुद्र दिसतों आहों ! त्या एका गुच्छानें खोलीचा सगळा नूर पालटून जाई. त्या वेळीं मीं आयुष्यांत प्रथमच काळा गुलाब पाहिला ! काळसर मखमलीसारख्या पाकळ्यांचें तें फूल म्हणजे एक अजब चीज होती.

ज्यांना झाडांच्या जोपासणीचें हें जिकिरीचें काम निभण्यासारखें नाहीं पण ज्यांना वेलाफुलांचा आनंद तर हवा आहे त्यांच्या जोगतीं झाडेंझुडपेंहि आपल्याकडे आहेतच. सायलीची वेल एकदां आळें करून

लाविली कीं मग तिच्याकडे फारसें लक्ष न दिलें तरी चालतें. गरिबाच्या मुलासारखी ती आपली वाढत जाते नि बाराहि महिने फुलत राहते. सायलीवर चारदोन फुलें नाहींत असें कधीं व्हायचेंच नाहीं. आपसुख वाढणारी आणि अव्याहत गोड नाजुक फुलें देणारी वेल आहे ती. पारिजातक तर कमालीचा निरिच्छ. तो कोठेंहि लावा. त्याला पाणी द्या नाहींतर देऊं नका. लहानपणीं माझ्या थोरल्या बहिणीला उद्देशून आई एक गाणें म्हणायची—

> " तुळशी तुळशी मी आहें आळशी ।
> मला फावलं तर घालिन तुला पाण्याची कळशी ॥ "

अगदीं अशा प्रकृतीच्या माणसांनासुद्धां पारिजातकाचा भार वाटणार नाहीं. चरबरीत पानांचें हें झाड एरवीं दिसायला जरा संन्याशीच दिसतें. पण पावसाळी ढग आभाळांत भरून आले आणि त्यांतून अमृताचा शिडकाव सुरू झाला कीं या रांगड्या झाडाला कसला आनंद होतो कोणास कळे. त्याच्या पांढुरक्या गांठाळ अंगोपांगांतून हिरवे रोमांच फुटतात. अगदीं बुंध्यापासून शेंड्यापर्यंत. आणि मग त्याला सुगंधाचीं झुंबरें लटकतात. संध्याकाळीं फुलं लागलेल्या पारिजातकाखालून तूं कधीं गेली असशील ना? मोत्याहिऱ्यांचा शिणगार केलेली सम्राज्ञी सुद्धां त्याच्यापुढें किस झाड की पत्ती?

आणि सकाळीं? सकाळीं पारिजातकाखालून जाणें म्हणजे पुण्यपावन भूमीवरून जाण्यासारखेंच निदान मला तरी वाटतें. पाऊल टेकावें तरी कोठें? साऱ्या भूमीवर त्या वृक्षराजाची उदारता अंथरलेली असते ना! कसें ठेवायचें पाऊल? आपले अच्युतराव पटवर्धन बोलण्यांत किती मार्मिक आहेत तुला ठाऊक आहेच. ते एकदां म्हणाले " द्यावें तर पारिजात-

कासारखें द्यावें. तो मूठ पुरेपूर उघडून देतो. कांहीं म्हटल्या कांहीं मागें ठेवीत नाहीं. वा:, याला म्हणावें दान ! ”

पण डवरलेलीं रोपटीं आणि बहरलेलीं फुलें पाहणें म्हणजे बाग-काम नव्हे ! जागा आंखून घ्यायची,विटा बसवून वाफे तयार करायचे, माती खणून त्यांतले विटकरीचे तुकडे, दगडगोटे निवडून काढून ती सारखी करायची, बीं पेरायचें, वाफ्यांना पाणी पाजायचें, वाफ्या-भोंवतीं रीप लावायची, जरूर तीं झाडें छाटणीनें छाटायचीं, कलमें बांधायचीं, या प्रत्येक कामांत निरनिराळी गंमत असते. त्यांत एक प्रकारचा खरबरीत दणकट आनंद असतो. उदाहरणार्थ, माती खणीत असतांना मातीमध्यें खोल घुसलेल्या हरळीचीं व नागरमोथ्याचीं मुळें आणि दूरच्या झाडांची लांबवर आलेलीं आगंतुक पाळें जेव्हां उपटून निघतात तेव्हां जो सूक्ष्म, भुइमुगाच्या ओल्या दाण्यासारखा वास सुटतो तो मला आवडतो. जमिनींत घर करून बसलेले काळेकुट्ट बागुर्डे कुदळीच्या टोकानें आपलें घर एकदम उध्वस्त झाल्याचें पाहून ज्या चलाखीनें एखाद्या ढेकळाआड भूमिगत होतात ती चलाखी पाहण्यासारखी असते. वाफ्यांमधलीं काळीं टणक ढेकळें पाण्याचा स्पर्श होतांच आपल्या डोळ्यांदेखत लोण्यासारखीं मऊ होत जातात तेव्हां त्यांना हळूच हात लावावा आणि त्यांतून वर येणारे सुगंधाचे वाफारे खाऊन टाकावे असें मला वाटतें. माती मऊ करून घेऊन त्यांत डबल-बीचें बीं लावलें कीं चार पांच दिवसांनंतर जमिनीच्या कवचा फोडून जे ठसठशीत कोंभ वर येतात ते पाहिले कीं जीवनशक्तीचा तो जोरदार आविष्कार पाहून मन मुग्ध होऊन जातें. आणि झारीनें रोपांना सचैल स्नान घातल्यावर त्यांच्या पानागणिक जेव्हां दूध पिऊन

तृप्त झालेल्या मुलाच्या तोंडावर दिसतो तसा टवटवीतपणा दिसूं लागतो, तो पाहिल्यावर आपल्याला म्हणावेसें वाटतें, "भरलं ना पोट ? झालं ना समाधान ? आतां उद्यां संध्याकाळपर्यंत हट्ट नाहीं हो करायचा !"

पण याहिपेक्षां आनंद आहे गुलाबाचीं कलमें बांधण्यांत. धारदार, लखलखीत पात्याचा चाकू घ्यायचा, मग उत्तम जातीच्या गुलाबाच्या जरा तांबूस तोंड दाखवूं लागलेल्या डोळ्याचा सफाईनें काप काढायचा, त्यांतला लाकडाचा गीर हलक्या हातानें वेगळा करायचा, डोळा सुकून जाऊं नये म्हणून जिभेवर तो अलगद ठेवायचा, मग गांवठी गुलाबाचें चांगलें ठोसर पण फार जून नाहीं असें कांड पाहून त्यावर चाकूच्या पात्यानें चिरा पाडायच्या, आणि वरची साल हळूच उघडून त्यांत जातिवंत गुलाबाचा डोळा भरून, केळीच्या सोपाच्या बंदांनीं तो सांधा पक्का बांधून घ्यावयाचा. असें कलम बांधीत असतांना काय बिशाद आहे माणसाचें लक्ष इकडे तिकडे जाईल ? आपण कोणीतरी एक बडे शस्त्रवैद्य असून एखादी अवघड शस्त्रक्रिया आपण करीत आहों अशीच त्या वेळीं माणसाची भावना असते. आणि ही शस्त्रक्रिया पार पाडल्यावर दोन तीन आठवड्यांनीं जेव्हां कां तें कलम जमून येतें आणि त्या डोळ्यांतून लालचुटूक पानांचे इवलेसे अंकुर फुटतात तेव्हां वाटतें कीं लहान मुलाच्या बोटांचा आपण "पापा" घेतों तसा त्या लाल कोवळ्या धुमाऱ्याचा पापा घ्यावा !

बागकाम मी एवढें पसंत करतों त्याचें कारण हें असें आहे. त्यांत सर्व प्रकारच्या भावना अनुभवावयास मिळतात. गाठाळ जमिनीवर कुदळीचे घाव घालतांना प्रतिस्पर्ध्यावर विजय मिळविल्याचा आनंद

उपभोगतां येतो. वाफ्याच्या विटांची रचना करतांना किंवा कुंपणाच्या डयुडोनियाची छाटणी करतांना कारागिराचें कसब दाखवितां येतें. सणसणीत तापलेल्या वाफ्यांना पाणी लावतांना उन्हाळ्यांत तहानलेल्यांना पाणी पाजण्याचें जणूं पुण्यकृत्य आपण करीत आहोंत असें समाधान वाटतें. रोपटीं तरारून वाढूं लागलीं कीं त्यावर पडणारा मावा अथवा कीड झटकतांना आईला मुलासंबंधीं वाटणारी वात्सल्याची भावना आपल्या मनांत दाटून येते. कलमें बांधतांना शस्त्रवैद्य बनल्याची जाणीव आपल्या मनाला गंभीर आणि आपल्या हातांना दक्ष बनवते. आणि वेल वाजूं लागले अथवा रोपटीं बहरूं लागलीं कीं आपलीं कर्तबगार निघालेलीं मुलें शेजाऱ्या–पाजाऱ्यांना दाखवितांना मातापित्यांना जी धन्यता वाटते तिचा अनुभव आपणांस घेतां येतो ! हात, डोळे आणि नाक या इंद्रियांवर बागकामांत जे संस्कार घडतात तेहि फार मोलाचे आहेत. सायली, नेवाळी, जाई, [ तांबड्या छटेची आणि शुभ्र पांढरी ] जुई, चमेली, कुंद यांतले भेद अनेकांच्या डोळ्यांना समजत नाहींत. मोगऱ्यांत एकेरी मोगरा, मोतिया, बटमोगरा, मदनबाण इत्यादि जाति आहेत त्या देखील आपल्याकडच्या अनेकांना ठाऊक नसतात. जास्वंदीचें साधें झाड घे. त्यांत तांबडी एकेरी, तांबडी गुच्छेदार, तांबडी कात्री, पांढरी, भगवी, सदाकळी असे प्रकार आहेत, त्याची कोण दखल घेतो ? वासांच्या बाबतींत तर कांहींजण शुद्ध दगड असतात. हें एक प्रकारें अक्षम्य असें अज्ञानच नव्हे काय ? त्याचें कारण काय ? डोळे, कान आदिकरून इंद्रियांवर योग्य ते संस्कार घडलेले नसतात हेंच त्याचें कारण. त्यामुळें परिणाम असा होतो कीं तृणपर्णांचें जें अपार जग आमच्या भोंवतीं पसरलेलें

आहे त्याच्याशीं आमचें कांहीं नातें उरत नाहीं. ह्या वृक्षवल्लरींनीं भरलेल्या सोयऱ्यांशीं नातें जोडण्याचा प्रयत्न व्हावयास नको काय ?

आतां पुण्याला आल्यावर आठपंधरा दिवस मी घरींच राहणार आहे. त्या वेळीं तुझी परीक्षाहि संपलेली असेल. तेव्हां तूं आणि मी बागेंत खूप काम करूं. खणून, खुरपून अंग ठणकेल, हात चरबरीत व हुळहुळे होतील, पायांच्या आणि हातांच्या नखांवरील रंग उडून त्यांत माती भरेल पण त्याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. कारण तूं लावलेल्या अबोलीला किंवा जाईला कळ्या आल्यावर तूं जेव्हां त्यांची वेणी घालून शाळेंत जाशील आणि तुझ्या मैत्रिणी कौतुकानें "अय्या, शुभा, कुठनं आणलीस ग एवढी भरगच्च वेणी ?" असें विचारतील तेव्हां "इश्श, कुठून कसली ? मीं लावलेल्या अबोलीची अथवा जाईची आहे ती," असें उत्तर केवढ्या अभिमानानें तुला देतां येईल याची कल्पना कर.

तुझा

**नाना**

मुंबई २८।१।५२

  

## १० : नागफणी

प्रिय शुभा,

सप्रेम आशीर्वाद.

मला चहा विशेष असा आवडत नाहीं हें तुला ठाऊकच आहे. पण दोन मिनिटांपूर्वी चांगला टमरेलभर चहा पिऊन जेव्हां मीं भांडें खालीं ठेवलें तेव्हां जर मला कोणी चहाविषयीं माझें मत विचारलें असतें तर मीं म्हटलें असतें कीं, " चहासारखं पेय दुनियेंत दुसरं नाहीं ! थोडा आणखी द्या असला तर ! " खंडाळ्याच्या आजच्या या वातावरणांत गोठवलेल्या दुधाच्या चहालासुद्धां अशी कांहीं विलक्षण चव प्राप्त झालेली आहे कीं तसला चहा आपण पूर्वीं कधींच प्यालेले नाहीं असें मला वाटलें. आचार्य अत्र्यांच्या बंगल्याच्या ओटीवर मी उभा होतों. अंगावरचे भिजून चिंब झालेले कपडे बदलून मीं नुकतेंच अंग कोरडें केलें होतें. बाहेर धो धो पाऊस पडत होता. अत्र्यांच्या बंगल्यामागचा डोंगर सगळीकडून निथळत होता. पावसाच्या सरी अशा दाट पडत होत्या कीं वीस पंचवीस पावलांपलीकडचें दृष्टीला दिसत नव्हतें. ठिबकणाऱ्या पागोळ्यांनीं रांगडा ताल धरला होता आणि

पऱ्यावर सरीचे ताशे तडाडत होते. पावसाच्या अखंड मारापासून स्वत:चा बचाव करण्यासाठीं कीं काय, झाडें आपल्या अंगावर शेवाळ्यांच्या फाटक्या वाकळा घेऊन उभीं होतीं. पण ओलीचें हींव थेट नसांत शिरल्याकारणानें वाऱ्याच्या प्रत्येक झोक्याबरोबर विचारीं कुडकुडत होतीं, थरथरत होतीं. पाणी खोलवर मुरून जमिनीला आतां पाणी पोटांत धरवेनासें झालें होतें आणि त्यामुळें तिला ठिकठिकाणीं उमळ फुटले होते. असा समोरचा देखावा पाहात, गेल्या पांच तासांत जें पोटभर पाहून घेतलें होतें त्याचें रवंथ करीत, अण्णा रणदिव्यांनीं आणून दिलेल्या गरमागरम चहाचे घुटके अधूनमधून घेत, मी किती वेळ तरी ओसरीवर उभा होतों. गमतीनेंच पण मला डिवचण्यासाठीं मागून कोणीसें म्हणालें, " आज आणखी एक पत्र शुभासाठीं तयार होणार बहुतकरून. मीं म्हटलें, कां नाहीं ? जरूर होणार ! "

ऐन श्रावणामध्यें खंडाळ्याची सहल काढण्याची ही कल्पना प्रथम कोणाला सुचली तें मला माहीत नाहीं. पण वरकरणीं वेडगळ वाटणारी ही कल्पना सुचविणारा मनुष्य सृष्टीचा प्रेमी व मोठा रसिक मनाचा असला पाहिजे यांत शंका नाहीं. मला जेव्हां समजलें कीं मुंबईचे व पुण्याचे सेवादल सैनिक खंडाळ्याची श्रावणी-सहल करणार आहेत तेव्हां मीं त्यांच्यांत सामील होण्याचें ठरवलें. खंडाळ्याला आषाढ ते भाद्रपद नेहमींच पावसाचा जोर असतो आणि त्यांतल्या त्यांत श्रावणाच्या महिन्यांत तर तेथें पावसाचा कायमचाच तळ पडलेला असावयाचा. तेव्हां या महिन्यांत खंडाळ्याला जावियाचें म्हणजे वर्षर्तूचें ऐन भरांतलें दर्शन घडावें यासाठींच जावयाचें. त्रिपुरी पौर्णिमेच्या चांदण्यांत जबलपूरपासल्या भेडा-घाटाची शोभा नर्मदेच्या पात्रांतून

पाहण्याच्या तोडीचाच हा प्रकार ! तेथें जसें वरून कापरासारखें चांदणें, खालीं नर्मदेचा आरस्पानी प्रवाह आणि भोंवतीं संगमरवरी पाषाणांचे तट असा देखावा दिसतो त्याचप्रमाणें येथें वरून पान्हा सोडण्यासाठीं अधीर झालेल्या कपिला गाईच्या कळपासारखे लगबगीनें निघालेले ढगांचे कळप, खालीं अभ्यंग न्हाऊन निघालेली धरणी व सभोंवतीं सर्वांग बहरून आलेलें हिरवें कंच रान अशी शोभा दिसते. दोन्हीहि शोभांचेच प्रकार. पण किती आगळे आणि किती वेगळे ! ऐन चांदण्यांतल्या भेडा घाटाची शोभा श्रेष्ठ कीं वर्षाऋतूंतल्या खंडाळ्याच्या गिरिशिखरांची शोभा श्रेष्ठ, असा प्रश्न बरीक जर मला कोणी टाकला तर मी म्हणेन कीं "अशी निवड करायला मला कोणी सांगूं नये. एका हातावर तुम्ही हुर्मुजी मोत्याचा दाणा घेतलात आणि दुसऱ्या हातावर पांचूचा खडा घेतलात आणि त्यांतून मला जर निवड करायला सांगितलीत अथवा नागचाफ्याचें आणि हिरव्या चाफ्याचें फूल पुढे करून त्यांतलें एक कोणतें तरी उचला म्हटलेंत तर मला निवड कशी करतां येईल ? पण एवढें मात्र निश्चित कीं भेडा–घाटाचें सौंदर्य जसें कोणीहि डोळे भरून पाहावें असें आहे म्हणजे सहज साध्य आहे, तसें हें सौंदर्य नव्हे. हें पाहावयाचें असेल तर पाय बळकट पाहिजेत, छातींत दम पाहिजे आणि पांच सात तास सतत पावसांत भिजण्याइतका अंगांत काटकपणा पाहिजे.

आम्ही सकाळीं बरोबर ८॥ वाजतां अत्र्यांचा "राजमाची दर्शन" बंगला सोडला. दहा दहाची एक अशा चार तुकड्या भाऊसाहेब रानड्यांनीं निघतांना तरी पाडल्या होत्या. २५–३०

मुंबईचे सेवादल सैनिक व १०–२० पुण्याचे सैनिक असा हा सुमारें चाळीस जणांचा मेळावा होता. राजमाची दर्शनापासून नागफणीवर जाऊन यावयाचें ठरलें होतें. नागफणी म्हणजे ज्याला डयूक्स् नोज असें आपणा सुशिक्षित लोकांत नांव आहे तें सह्याद्रीचें नाकाड. मी पुणें ते मुंबई प्रवास आतांपर्यंत शेंकडों वेळां केला असेल आणि तितक्याच वेळां हें भव्य गिरीशिखर पाहिलें असेल. पण ह्या डयूक्स् नोजला आपल्याकडे नागफणी असें अत्यंत सुंदर आणि समर्पक नांव आहे याची मला कल्पना नव्हती ! घरचें असलेलें टाकायचें आणि परक्याचें उचलून घ्यायचें ही वृत्ति आपल्या पारतंत्र्याची खूण अजूनहि आपल्यामध्यें दिसून येते. असो. पहिली चढण संपून आम्ही जरा उताराला लागलों होतों. त्या वेळीं खालच्या तळ्यावर मासे मारावयास निघालेले दोन कोळी आम्हांला भेटले. त्यांच्याशीं बोलतांना मला कळलें कीं डयूक्स् नोजचें त्या भागांतलें रूढ नांव नागफणी आहे म्हणून !

नागफणीची चढण चांगलीच दमछाक करणारी आहे. पावसामुळें जमीन अगदीं निसरडी झाली होती. त्यामुळें वर पोंचेपर्यंत आमच्यापैकीं अनेकांनीं अनेकदां साष्टांग नमस्कार घातले. कोणी पडला म्हणून त्याला हंसावें तों हंसणाराच सटकन् आडवा व्हावयाचा. ठिकठिकाणीं आधार घ्यावयाला गवताचे पंदे आणि झुडपें होतीं म्हणून बरें. तीं नसतीं तर हें पडण्याचें प्रमाण दुप्पटीनें तरी वाढलें असतें. नागफणीची खडी चढण चढत असतांना खालून धुक्याचा समुद्र आमच्या मागोमाग एक एक पाऊल चढत येतच होता. जिकडे नजर टाकाल तिकडे धुकेंच धुकें. पायातळच्या धुक्यांतून आमचीं

मित्रमंडळी वर उमटत होती आणि डोक्यावरच्या धुक्यांत अंतर्धान पावत होतीं. थोड्या अंतरावरच्या धुक्यांत अस्पष्ट दिसणारीं तीं झाडें, डोंगराच्या उतरणीची अंधुक रेषा, त्यावरून जाणारे आमचे सोबती हें सगळें दृश्य एखाद्या स्वप्नसृष्टींतल्या दृश्याप्रमाणें भासत होतें. पण शेवटीं आम्ही जेव्हां नागफणीच्या माथ्यावर पाय ठेवला तेव्हां सगळें वातावरण बदलून गेलें. तेथें धुकें मुळींच नव्हतें. आमची साथ सोडून तें खालीं राहिलें होतें. सगळी पृथ्वी पाण्यांत बुडालेली आहे आणि त्या जलप्रलयामध्यें शाबूत राहिलेल्या कोठल्यातरी खडकाच्या आसऱ्यानें आम्ही पांचपंचवीस मानवी प्राणी जीव वांचवून उभे आहोंत असें तें दृश्य दिसत होतें. तिन्ही बाजूंनीं कडे तुटलेल्या नागफणीच्या अंगावर धडका घेणारे मातलेल्या हत्तीसारखे ढग पूर्व दिशेला पळत सुटले होते. अधूनमधून पावसाची एखाददुसरी सर सपकारा मारून जात होती आणि नागफणीवरच्या कमरेइतक्या खोल वाटोळ्या खड्ड्यांत सांठलेल्या पाण्यामध्यें तरंग वर्तुळें उठवीत होतीं. बाकी तेथें ना पक्षी होता ना प्राणी. वाऱ्याचा फुंफाट मात्र विलक्षण चालला होता. आपल्या नागफणीवर आम्ही पाय ठेवल्यामुळें संतापलेला तो गिरिसर्प चिडून फुत्कार करीत होता कीं काय कोण जाणे ?

आम्हीं नागफणीवर सुमारें अर्धा तास विश्रांति घेतली. कोणाचा हाकारा सर्वांत दूर जातो तें पाहिलें, गाणीं म्हटलीं, गवत उपटून तें नागफणीवरून खालीं झोकलें कीं तें खालीं न जातां उलटें वर कसें जातें तें पाहिलें, आणि मग आम्ही उठलों. पण अजून आमचें समाधान, खरें पूर्ण समाधान, झालेलें नव्हतें. आतांपर्यंत पाहिलेले धबधबे, खळाळ, धुकें, हिरवीं शेतें व पोपटी कुरणें यांनीं आमच्या

डोळ्यांना सुखविलें असलें तरी निववीलें नव्हतें. तुडुंब तृप्ति जिला म्हणतां येईल ती अजून झाली नव्हती. नागफणीवर उभे राहून खालची दरी कशी दिसते तें आम्हांला पाहावयाचें होतें आणि ती तर धुक्याचें इरलें डोईवर घेऊन पाठमोरी होऊन बसली होती. म्हणून आम्ही अतृप्त होतों.

पण लवकरच आमची इच्छा तृप्त होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं. कारण दरीकडची धुक्याची फळी उजळत जाऊं लागली. त्याचा अर्थ असा होता कीं ढगांच्या फळींत कोठेतरी फट पडली होती आणि त्यांतून सूर्यकिरणांचे तळपते भाले आंत घुसूं लागले होते. क्षणाक्षणाला धुकें अधिकाधिक उजळत चाललें, विरळ होऊं लागलें आणि मग वाऱ्याच्या एका प्रचंड झोतासरशीं आमच्या समोरचा धुक्याचा झिरझिरीत झालेला पडदा मधोमध चिरला जाऊन त्याच्या धांदोट्या लोंबूं लागल्या. आणि त्या क्षणींच आमच्या दृष्टीसमोर जो देखावा उभा राहिला त्याचें वर्णन शुभा, कोण करूं शकणार ?

आम्ही मंतरल्यासारखे मुग्ध होऊन पाहात होतों. दोन हजार फूट खोल अशी ती दरी कल्पनातीत सुंदर दिसत होती आणि जितकी सुंदर तितकीच भयावह दिसत होती. तूं म्हणशील सुंदर आणि भयावह अशीं दोन परस्परविरोधी विशेषणें तुम्ही एकाच वेळीं वापरतां याचा अर्थ तरी काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे. पण निसर्गांतल्या अनेक गोष्टी अशा असतात खऱ्या. त्यांचें सौंदर्य इतकें भव्य असतें कीं आपला जीव त्या भव्यतेंत दडपून जातो, पण त्याचबरोबर पोटांतून भीति वाटत असूनहि आपलें मन त्यांच्याकडे ओढ घेतच असतें. आकर्षण आणि धाक ह्या दोन्ही भावना ज्यामुळें

एकदमच निर्माण होतात त्या सौंदर्याला नुसतें सौंदर्य न म्हणतां मला वाटतें कीं दिव्यत्व म्हणावें. नागफणीवरून आम्हीं जें पाहिलें तें निःसंशय दिव्य कोटींतलेंच होतें. पांच दहा क्षणच आम्हीं निसर्गाचें हें भव्य रूप पाहिलें असेल! पुन्हा ढगांचा पडदा सांधला गेला आणि नागफणीच्या भोंवतीं सगळीकडे पुन्हा धुक्याचा समुद्र पसरला. पण तेवढ्या अवधींत आमचीं मनें त्या साक्षात्कारानें कांठोकांठ भरून गेलीं होतीं, हरखून गेलीं होतीं. स्वच्छ धुतलीं गेलीं होतीं. नागफणीवरचा वारा आम्हीं पुन्हा एकदां पिऊन घेतला आणि त्या मस्तींतच आम्हीं आमची परतीची वाटचाल पुरी केली. परत येत असतां वाटेमध्यें माझ्या मनांत एक शंका आली ती अशी कीं नागफणीवर शंकराचें मंदिर कोणीं बांधलें नाहीं, हें कसें? एवढी मोक्याची वास्तु आतांपर्यंत कोणाच्या नजरेंत भरली नाहीं हें आश्चर्य! कारण कोठें जलप्रपात असो, नदीतटाक असो, गिरिशिखर असो, जेथें अशी गूढ गंभीर वास्तु असेल तेथें शिवालय नाहीं असें सहसा व्हावयाचें नाहीं. पाशुपतेश्वरापासून रामेश्वरापर्यंत त्या दिव्य किरातार्चीं पावलें या भरतभूमीवर सर्वत्र उमटलेलीं आढळून येतात.

शुभा, आपण मुंबईपुण्यासारख्या शहरांत राहणारे लोक निसर्गापासून अतिशय दुरावत चाललों आहोंत. आपली राहणी अतिशय कृत्रिम होऊं लागली आहे. थर्मास, टिनचे डबे, कांक्रीट आणि डांबर यांनीं सध्यां आपली संस्कृति बनत आहे. आम्हांला अनवाणी चालतां येत नाहीं, उन्हांत जरा वेळ गेलें तर डोकें कलकलूं लागतें आणि पावसाचा थेंब अंगावर पडला तर पडसें येतें. ज्या पंचमहाभूतांतून आपला हा देह घडला त्यांचें विमुक्त व स्वैर दर्शन आपल्या ह्या

राहणीमुळें आपणाला दुर्मिळ होऊं लागलें आहे. लाटांचें तांडव, ढगांचा धिंगाणा, वाऱ्याचें थैमान आम्हांला क्वचितच पाहावयास सांपडतें. गुडघाभर वाढलेल्या गवतावर दवाचे मोती लागडलेले आहेत अशा प्रभात–वेळीं तूं शेताच्या बांधांवरून अथवा माळावरून जाणाऱ्या नागमोडी पायवाटेनें कधीं गेली आहेस का ? खडकावरून फेसाळत खालीं पडणाऱ्या दुधासारख्या पाण्याच्या धारेखालीं मनसोक्त न्हाली आहेस का ? रानांतून हिंडतांना घायपाताच्या बेटांत मधमाशांनीं लावलेलें मोहोळ धुंडून काढून तो ताजा, पिवळाधमक व सुगंधी मध चोखतांना जो आनंद होतो त्याची चव तूं कधीं घेतली आहेस काय ? या सृष्टीमध्यें मनुष्य हाच कांहीं एकमेव प्राणी नव्हे. अक्षरशः लक्षावधि पशु, पक्षी, कीटक या पृथ्वीवर आहेत. त्यांतला मनुष्य हा एक. पण आपल्या व्यतिरिक्त ही जी अपरंपार जीवसृष्टि सभोंवार पसरलेली आहे तिच्याकडे आपणां शहरी लोकांना पाहावयाला वेळ आहे कोठें ? आपणाला त्याची जरूरच भासत नाहीं. तूं लहान होतीस तेव्हां एकदां वासरूं गाईला लुचतांना तूं पाहिलेंस. गाईचें तें चाटणें, वासराचें तें शेपटी वर करून गाईच्या कासेला ढुशा देत देत लुचणें पाहून तुला केवढी गंमत वाटली ? पण हें पूर्वी जवळजवळ घरोघर दिसणारें दृश्य आतां मुंबई–पुण्याकडच्या मुलांना दिसणें अशक्य झालेलें आहे. त्यांना जर विचारलें कीं " दूध कोण देतं ? " तर त्यांच्याकडून बहुधा उत्तर असें मिळेल कीं " भय्या देतो ! " आपणाला जांभळीचें झाड, हिरडयाचें झाड, वडाचें झाड, सागाचें झाड, असा फरक कांहीं उमगावयाचा नाहीं. ताड काय नि माड काय सगळे सारखेच. आम्हांला इथून तिथून सगळीं झाडेंच. सब

घोडे बारा टक्के. पण ही गोष्ट योग्य नव्हे. कारण त्यामुळें आमचा आनंद खुरटा होतो आहे. त्यांतली विविधता नष्ट होत आहे. आमच्यांतील रग नाहींशी होत चालली आहे. आयुष्यांतले सगळे दिवस आपण जर भोंकाचे पैसे, कागदाचीं फुलें, सडकी कोथिंबीर आणि चिवट कागदांतलें चाकोलेट यांच्याच सहवासांत घालवूं लागलों तर आपलीं मनें क्षुद्र न बनतील तर काय बनतील ? असले विचार मनांत आले कीं वर्डस्वर्थ कवीच्या पुढील ओळींची मला आठवण होते :

" This sea that bears her bosom to the moon,
The winds that will be howling at all hours;
And are up-gathered now like sleeping flowers,
For this, for every thing we are out of tune;
It moves us not—"

पुढच्या खेपेला मी तुला बरोबर घेऊन नागफणीवर जाण्याचा निश्चय केलेला आहे. तूं चालण्याची संवय करून ठेव म्हणजे झालें

तुझा

**नाना**

१०।९।५२

## ११ : आपले पंतप्रधान

प्रिय शुभा,

सप्रेम आशीर्वाद.

आतांपर्यंत मी कांहीं थोडयाथोडक्या सभा पाहिलेल्या नाहींत. "प्रचंड सभा" असें ज्यांचें वर्णन वर्तमानपत्रांतून करण्यांत येतें अशा सभाहि मीं पाहिलेल्या आहेत. पण गेल्या आठवडयांतली मुंबईच्या चौपाटीवरची ती सभा खरोखरच " न भूतो न भविष्यति " अशी होती. लोकमान्य टिळकांच्या पुतळ्यापासून तिन्ही दिशांना दृष्टि पोंचत होती तोंपर्यंत जणूं कांहीं माणसांच्या डोक्यांचा समुद्र पसरलेला होता. झाडें, घरांच्या गच्च्या व सज्जे, फुलांचे कठडे जेथें जेथें म्हणून तिळभर जागा सांपडली तेथें तेथें माणूस बसलें होतें. आणि हें कशासाठीं ? तर पंडित नेहरूंना एकवार पाहतां यावें म्हणून ! पाहतां नाहीं आलें तर निदान त्यांचा एखादा शब्द तरी ध्वनिक्षेपकांतून कानावर पडला तर ऐकावा म्हणून !

पंडितजी सुमारे तासभर बोलले. त्यांचें भाषण त्या अफाट श्रोतृ-समुदायापैकीं कितीकांना समजलें कोणास ठाऊक ? पण भाषण

संपलें तसा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. भरतीचा समुद्र गरजतो तसा " पंडित जवाहरलाल नेहरू की जय " असा जयघोष निनादला आणि सभा हालली. सभा सुरू होण्याच्या अगोदर शहराकडून येणाऱ्या सर्व रस्त्यांमधून माणसांच्या नद्या वाहात येऊन चौपाटीवरच्या मानवी समुद्राला येऊन मिळत होत्या. आतां उलटा प्रकार सुरू झाला. धरण फुटल्यावर तुंबलेलें पाणी दाही दिशांनीं वाहूं लागतें तसे माणसांचे लोंढे शहराच्या दिशेनें माघारे धावूं लागले. त्या पुरांत आम्ही त्रिवर्ग सांपडलों. दत्तू काका, त्यांचे शेजारी सदुअण्णा किरकिरे आणि मी. आम्ही चालत नव्हतों, आपोआपच सँढर्स्ट पुलाकडे आणि तेथून पुढें गिरगांवाकडे ढकलले जात होतों. ती विराट् सभा आणि जनतेची जवाहरलालांवरील ती भक्ति पाहून विस्मित झालेले दत्तू काका मला म्हणाले :

" लोकांची पंडित नेहरूंवरील ही श्रद्धा देवादिकांच्यासुद्धां वांट्याला येणं कठिण ! केवढा भाग्यवान् पुरुष हो ! "

त्यावर मी दत्तुकाकांना म्हटलें : " पण त्यांना हा मोठेपणा कां लाभला याचा विचार तुम्ही कधीं करतां का ? "

एका पायांतील चप्पल गर्दीमध्यें नाहींशी आल्यामुळें आधींच जरा चिडलेले सदुभाऊ किरकिरे एकदम उसळून म्हणाले : " त्यांत कसला विचार करायचा ? सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते, दुसरं काय ? आधीं बडे बापके बेटे, त्यांतून आतां झाले आहेत पंतप्रधान. तेव्हां आमचे लोक धावताहेत मेंढरासारखे त्यांच्या मागोमाग "....

किरकिऱ्यांच्या ह्या सरबत्तीवर मी कांहीं उलट बोललों नाहीं. काय बोलणार ? त्यांतून त्यांची चप्पल हरवलेली ! तशा गर्दींत वाद-

विवाद करणें आणि सदुभाऊंची समजूत घालणें कठिणच होतें. म्हणून मी गप्प राहिलों. पण माझ्या मनांत विचार आला कीं धनाढ्य कुळामध्यें जन्म झाला किंवा कर्तृत्ववान् वडिलांचें छत्र लाभलें म्हणून मनुष्याला थोरपणा प्राप्त होईलच असें कांहीं निश्चियानें सांगतां येत नाहीं. पुष्कळदा तर असा अनुभव येतो कीं वाजवीपेक्षां अधिक खत पडल्यास रोप जसें जळून जातें तशीच संपत्तीची वाजवीपेक्षां अधिक अनुकूलता लाभली कीं मुलांतील सद्गुणांचा अंकुर करपून जातो. किंवा मोठ्या वृक्षाच्या सावलींत नवा कोंभ नेट धरीत नाहीं त्याप्रमाणें फार श्रेष्ठ पदवीवर चढलेल्या पित्याचीं मुलें गुणांनीं खुरटीं निपजतात. पण याला अपवाद अशीं मुलेंहि क्वचित् आढळतात. त्याचपैकीं पंडित जवाहरलाल नेहरू होत. जन्मजात श्रीमंती असूनहि ते ऐदी बनले नाहींत किंवा पंडित मोतिलालजी नेहरूसारख्या विख्यात पित्याच्या सान्निध्यानें त्यांचें तेज फिकें पडलें नाहीं. उलट घरच्या ऐश्वर्याचा आणि पित्याच्या सहवासाचा त्यांनीं आपल्या अंगच्या गुणांचा विकास करून घेण्याच्या कामीं उपयोगच करून घेतला.

पंडित मोतिलाल नेहरू आणि स्वरूपराणी नेहरू यांचीं जवाहर-लाल, विजयालक्ष्मी व कृष्णा हीं तीन अपत्यें. जवाहरलाल हे सर्व भावंडांत थोरले. जवाहरलालांना चांगलें शिक्षण देण्यांत आणि उत्कृष्ट चळण लावण्यांत पंडित मोतिलालजींनीं मुळीच कसूर केली नाहीं. लहानपणीं जवाहरलालांना शिकविण्यासाठीं त्यांनीं चांगले शिक्षक नेमले आणि त्यांची प्राथमिक तयारी झाल्यावर दुय्यम व उच्च शिक्षणासाठीं त्यांना इंग्लंडांत पाठविण्यांत आलें. इंग्लंडमध्यें बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण होऊन १९११ सालीं ते हिंदुस्थानाला परतले. पण

त्यांनीं वकिली अशी फारशी केलीच नाहीं. १९१५ सालीं त्यांनीं जो राजकारणांत प्रवेश केला तो कायमचाच. आज तीन तपानंतर स्वतंत्र हिंदुस्थानचे ते पंतप्रधान बनले आहेत आणि जगामध्यें जे अग्रगण्य असे एका हाताच्या बोटावर मोजण्यासारखे लोकनेते आहेत त्यांमध्यें त्यांना श्रेष्ठ स्थान प्राप्त झालेलें आहे !

हिंदुस्थानामध्यें तर पंडित नेहरूंच्या लोकप्रियतेला सीमा नाहीं ! देशामधील जनतेंत त्यांना हें जें अद्वितीय स्थान प्राप्त झालेलें आहे याला कारण काय ? केवळ त्यांची गर्भश्रीमंती ? कीं त्यांना लाभलेलें पित्याचें पाठबळ ? नाहीं. नेहरूंच्या अंगीं असे असाधारण गुण आहेत कीं जेथें जातील तेथें ते चमकलेच पाहिजेत. " पंडित नेहरूंचे कोणते गुण तुम्हांला विशेष आवडतात ? " असा जर कोणी मला प्रश्न केला तर मी सांगेन कीं " त्यांच्या अंगीं अनेक गुण आहेत. पण त्यांच्या ठिकाणची निर्भयवृत्ति, त्यांच्या ठिकाणचा कामाचा उरक, त्यांची ज्ञानलालसा आणि त्यांची अभिरुचि, हे चार गुण मला विशेष प्रिय वाटतात. "

काश्मीरमध्यें अमरनाथाच्या प्रवासांत घडलेल्या अपघाताची गोष्ट तूं वाच, किंवा सायमन कमिशनच्या निषेधार्थ काढलेल्या मिरवणुकींत त्यांच्यावर झालेल्या लाठीहल्ल्याचें वर्णन पाहा. फरीदकोटच्या सरहद्दीवर पंडितजींची मोटर अडवून तिच्यावरचें निशाण उतरवण्याचा हुकूम जेव्हां संत्र्यानें दिला तेव्हां पंडितजींनीं नकार देऊन मोटर तशीच पुढे नेली तें त्यांचें बाणेदार वर्तन आठव; अथवा दिल्लीमध्यें १९४७ सालीं उसळलेल्या हिंदुमुसलमानांच्या दंग्याच्या ऐन कहरांत एका दंगेखोराच्या हातची नंगी तलवार त्यांनीं हिसकावून घेतली तो प्रसंग

ध्यानीं आण, म्हणजे पंडितजींची निर्भयता कशा प्रकारची आहे तें तुझ्या लक्षांत येईल. वर्ष-दीड वर्षापूर्वी घडलेली गोष्ट सांगतों. हडपसरपाशीं नव्यानें स्थापलेल्या ग्लायडर तळाचें उद्‌घाटन करण्यासाठीं ते आले होते. त्या वेळीं तळाचें उद्‌घाटन तर त्यांनीं केलेंच. पण यंत्रसामग्रीवांचून नुसत्या वाऱ्याच्या झोतावर तरंगत हवेंत परिभ्रमण करणाऱ्या ग्लायडरवर ते फेरफटकाहि मारून आले. मला नाहीं वाटत कीं दुसऱ्या कोणत्याहि देशांतील पंतप्रधानानें हें साहस केलें असतें, अथवा त्यांच्या निकटवर्ती लोकांनीं करूं दिलें असतें म्हणून. कोणतीहि अडचण दिसली कीं तिच्याशीं स्वत: दोन हात करावे, कोठेंहि संकट दिसलें कीं कांठावर बसून नुसती शाब्दिक चिकित्सा करीत न राहतां संकटाच्या ऐन भोवऱ्यांत उडी घ्यावी, कांहीं अभिनव आढळलें कीं त्याचा स्वत: अनुभव घ्यावा,हा त्यांचा स्वभाव आहे.यश अशा व्यक्तीकडे आपल्या पायांनी चालत न येईल तर तें जाईल तरी कोठें ?

पंडितजींचा कामाचा उरक तर विलक्षणच आहे. तो पाहिला कीं त्यांची साठी उलटून गेलेली आहे याच्यावर माणसाचा विश्वासच बसत नाहीं. दहा दहा, बारा बारा तास काम करणें ही तर त्यांच्या बाबतींत रोजचीच गोष्ट होऊन बसलेली आहे. मला आठवतें कीं १९४९ च्या ऑक्टोबरांत ते खडकवासल्याजवळच्या लष्करी विद्यालयाच्या पायाभरणीच्या समारंभासाठीं पुण्यास आले होते. सकाळीं विमानानें ते दिल्लीहून निघाले आणि दहाच्या सुमारास पुण्यास पोचले. नंतर त्यांनीं किती कार्यक्रम उरकले असतील म्हणतेस ? त्यांनीं राष्ट्रीय रसायनशाळेस भेट दिली. लष्करी विद्यालयाची पायाभरणी

केली, पुणें नगरपालिकेचें मानपत्र स्वीकारलें, फर्ग्युसन कॉलेजवर पन्नास हजारांच्या सभेंत भाषण केलें, अनेकांबरोबरच्या मुलाखती संपवल्या, आणि इतकें केल्यानंतरहि मुंबई विधिमंडळाच्या श्रेष्ठ व कनिष्ठ सभागृहांच्या सदस्यांना उद्देशून भाषण करण्यासाठीं रात्रीं ११ वाजतां स्वारी हजर ! आणि हजर राहिले ते कसे ? आळसटलेले, मंदावलेले, त्रासलेले ? छे ! तर अगदीं प्रसन्न चेहऱ्यानें आणि टवटवीत मनानें. तूं पंडितजींची विमानांतून चढतां उतरतांनाची हालचाल पाहा, सभास्थानीं येतां जातांनाचें त्यांचें चालणें बोलणें पाहा, म्हणजे ते उत्साहाची आणि उद्यमशीलतेची केवळ मूर्ति आहेत हें तुला पटेल.

जवाहरलालजींची ज्ञानलालसा तर खऱ्या विद्याव्यासंगी माणसाला शोभणारी आहे. त्यांनीं ओळखलेलें आहे कीं यापुढचें युग विज्ञानाचें युग आहे. ज्या देशापाशीं विज्ञान नाहीं तो देश डोळे असून आंधळा ठरणार आणि हातपाय असून पांगळा ठरणार ! म्हणून त्यांच्याच प्रेरणेनें रसायनाची, पदार्थविज्ञानाची, वनस्पतिशास्त्राची, औषधोत्पादनाची अशा निरनिराळ्या प्रचंड संशोधनशाळा आपल्या देशांत स्थापन होत आहेत. कोठें खताचा कारखाना निघाला, कोठें दुग्धव्यवसायाची अद्ययावत् योजना सुरू झाली, कोठें शास्त्रज्ञांच्या परिषदेचें अधिवेशन सुरू झालें कीं पंडित नेहरू तेथें सांपडावयाचेच. तेथील सर्व उपक्रम ते नीट चित्त देऊन पाहतील, तेथील प्रमुखांना निरनिराळे प्रश्न विचारतील, सगळीकडे फिरून उत्साह निर्माण करतील. मधमाशी थेंबथेंब मध टिपतांना जशी कधीं कंटाळत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानकण टिपतांना ते कधीं कंटाळले नाहींत, ते

अखंड विद्यार्थी आहेत आणि म्हणूनच त्यांचें ज्ञान ताजें राहिलेलें आहे. आगगाडींत, विमानांत जेथें कोठें फुरसत सांपडेल तेथें ते वाचीत असतात. तरीहि ते अभ्यासजड बनलेले नाहींत, ही आणखी विशेष गोष्ट होय.

कारण जवाहरलालजींना केवळ विज्ञान तेवढेंच महत्वाचें वाटतें असें नाहीं. चित्रकला, इतिहास, वाङ्मय यांचीहि त्यांना गोडी आहे. विज्ञान हें सकस खरें पण तें तुपासारखें आहे. एखादा माणूस जर पुष्टिकारक म्हणून नुसतें तूपच ओरपूं लागला तर त्याचें शरीर-स्वास्थ्य टिकेल काय? शरीरक्रिया नीट चालू राहण्यासाठीं जसा षड्सात्मक आहार हवा त्याचप्रमाणें माणसाच्या मनःक्रिया जर सुव्यवस्थितपणें चालावयाच्या तर नुसत्या विज्ञानाचा आहार मनाला देऊन चालणार नाहीं. मनुष्याचें मन विज्ञानानें सकस बनतें तसें साहित्य, संगीत व कला यांच्या सेवनानें तें सुसंस्कृत म्हणजेच मृदु व व्यापक बनतें. पंडित नेहरूंचा या विविध विषयांशीं किती गाढ परिचय आहे हें त्यांनीं जगाच्या इतिहासावर लिहिलेला ग्रंथ वाचला कीं समजून येतें. त्यामुळे जवाहरलालजींच्या लेखनांत विद्वत्तेबरोबरच अपूर्व अशी रमणीयताहि दिसून येते. इंग्रजीमध्यें ते इतकें सुंदर लिहितात कीं जगांतल्या पहिल्या दर्जाच्या सहा इंग्रजी लेखकांमध्यें त्यांची आज गणना करण्यांत येते. खऱ्या अभिरुचिसंपन्न किंवा संस्कारसंपन्न माणसाशिवाय दुसऱ्या कोणालाहि असें लेखन साधावयाचें नाहीं.

काश्मीरमधील बर्फाच्छादित गिरीशिखरांचें अथवा उन्हामध्यें रुप्याच्या धारेप्रमाणें चमकणाऱ्या हिमनद्यांचें त्यांनीं केलेलें वर्णन तूं पाहा. अथवा सिलोनमधील आदरसत्काराची त्यांनीं लिहिलेली हकीकत नजरेखालून घाल. किंवा गांधीजींच्या हत्येनंतर त्यांनीं केलेलें भाषण

तूं वाचून बघ. म्हणजे सुसंस्कारी मन आणि वेचक शब्दयोजना यांची जुळणी झाली कीं लेखनामध्यें कसें भावसौन्दर्य प्रकट होऊं लागते तें तुला कळून येईल. पंडित नेहरूंच्या लेखणींत काव्याचे सारे गुण उतरलेले तुला आढळून येतील. अशा प्रकारची लेखनशैली सहजासहजी प्राप्त होत नसते. उचल लेखणी कीं कर खरडायला सुरुवात ही ज्याची पद्धति तो लेखन कसलें करणार कपाळाचें? मोत्याचा हार कसा गुंफतात तें तूं कधी पाहिलें आहेस? पटवेकरी सर ओवतांना एक एक मोती दोन बोटांत फिरवून फिरवून त्याचें पाणी, त्याचा आकार, त्याचें वजन पारखीत असतो आणि त्याच्या मनाजोगता दाणा मिळाला तरच तो सरांत गुंफतो. लिहितांना शब्दांची निवडहि अशीच कसोशीनें करावयाची असते. जवाहर-लालजींना शब्दांची छानदार पारख आहे. मला वाटतें कीं शब्द पारखण्याच्या कामीं गांधीजी तर जवाहरलालांहूनहि उजवे होते!

म्हणून त्या दिवशीं मी सदूभाऊ किरकिऱ्यांना सांगणार होतों कीं पंडितजी गर्भश्रीमंतीच्या जोरावर किंवा आपल्या वडिलांच्या नांवावर मोठे झालेले नाहींत. मोठे कुळ व मोठा पिता त्यांना लाभला हा योगायोग. पण त्याला आपल्या असामान्य कर्तृत्वाची जोड देऊन आपलें भाग्य त्यांनीं खुलवलें आहे. असो. श्रीयुत किरकिऱ्यांना त्या दिवशीं मला जें सांगतां आलें नाहीं तेंच आज पंडितजींच्या वाढदिवसाच्या निमित्तानें तुला सांगण्याची संधि घेत आहें.

तुझा

**नाना**

१२।११।५२



## १२ : चित्रांगदेचें माहेर

प्रिय शुभा,

आज बऱ्याच दिवसांनंतर इतक्या दुरून मी तुला पत्र लिहिण्यासाठीं बसलों आहें. तीन महिन्यांपूर्वी मी नेपाळांत गेलों होतों तेव्हा तेथल्या मुक्कामांत तुला पत्र लिहावें असें एकदां मनांत आलें होतें. पण तें राहून गेलें. आंतून तेवढी उचल नव्हती हेंच खरें. पण या खेपेला तुला लिहिल्याशिवाय मला राहवणार नाहीं. येथली भूमि, येथले लोक, येथलें वातावरण सर्वच असें कांहीं आहे कीं लेखणी हातीं घ्यावी असें माणसाला वाटावें.

आतां संध्याकाळचे पांच सव्वापांच वाजले आहेत, तरी आकाशांत चंद्रमा चांगला हातभर वर आलेला आहे. सगळीकडे गोड मखमली चांदणें पसरलें आहे.[१] इंफाल खोऱ्याच्या सभोंवार पहारा देणाऱ्या डोंगरमाथ्यांवर, मोर्चेलाप्रमाणें दिसणाऱ्या कळकी बेटांवर, रस्त्यांच्या दुतर्फा हारीनें उभ्या असलेल्या उंचच उंच काबुलिया

---

१. मणिपूर खूप पूर्वेकडे असल्यामुळे हिवाळ्यांत तेथे पांच वाजतां चांगलीच संध्याकाळ होते.

वृक्षांवर आणि ठेंगण्या ठुसक्या गवताळू घरांवर धुक्याची रजई पसरल्याप्रमाणे दिसतें आहे. पण थंडी अशी खट्याळ पडली आहे कीं अंगाभोंवतीं गच्च लपेटून घेतलेल्या शालीच्या आंत हात घालून ती खुशाल गुदगुदल्या करून जात आहे ! पलीकडच्या अंगणांत शेजारच्या घरांतलीं गोल तोंडावळ्याचीं मणिपुरी मुलें कांहीं तरी किलबिल करीत आहेत. तुला पत्र लिहायला याहून चांगली वेळ मिळणें शक्य आहे का सांग बरें ?

मणिपूर म्हणजे चित्रांगदेचें माहेर. शाळेंत असतांना प्रथम महाभारतांत मी अर्जुन–चित्रांगदेची कथा वाचली. बभ्रूवाहनाचें आख्यान वाचलें. अर्जुन–चित्रांगदेचा हा पराक्रमी पुत्र, वीर अभिमन्यूच्या तोडीचा धनुर्धर होता. पुढें अर्जुनाला आपल्या ह्या पुत्राचें स्मरण राहिलें नाहीं आणि अर्जुन दिग्विजयासाठी मणिपुरांत आला असतां पितापुत्रांचें तुंबळ युद्ध जुंपलें. अर्जुन–बभ्रूवाहनाच्या समराचें आख्यान तूं वाच म्हणजे सोहराब–रुस्तुमच्या कथेची आठवण तुला झाल्यावांचून राहाणार नाहीं. असो, मी तुला सांगत होतों तें हें कीं त्या कथा वाचल्यापासून मणिपूरचें चित्र मी मनांत रंगवीत होतों. आपलें प्राचीन वाङ्मय वाचलें कीं पुण्यपावन गंगा पाहावी, कृष्णप्रिया यमुना पाहावी, देवताधाम हिमालय पाहावा असें ज्याप्रमाणें आपणाला वाटत राहातें त्याचप्रमाणें हें चित्रांगदेचें माहेर केव्हां तरी पाहावें असें मला वाटत राहिलें. पुढें १९४४ सालीं ह्याच भूमीवर जेव्हां नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद सैनिकांनीं स्वतंत्र हिंदुस्थानचें निशाण रोवलें तेव्हां कोहिमा, इम्फाल, बिशनपूर इत्यादि ह्या भागांतलीं स्थळें एकदम प्रसिद्धीला आलीं आणि

मणिपूरविषयींच्या आकर्षणांत भर पडली. तथापि 'काशिस जावें नित्य वदावें' असाच प्रकार मणिपूरच्या बाबतींत चालू होता. परंतु काल सकाळीं जेव्हा मी इंफालच्या म्हणजे मणिपूरच्या राजधानीच्या विमानतळावर उतरलों तेव्हा इतकीं वर्षें मनांत दडून राहिलेली इच्छा सफल झाली !

नेपाळांत गेलों तेव्हां नेपाळांत अपरिचित असें मीं पुष्कळ पाहिलें खरें, पण आपण एका वेगळ्या सृष्टींत आलों आहों असें कधीं वाटलें नाहीं. मणिपुरांत आल्यावर मात्र आपण निराळ्या जगांत आल्याची जाणीव झाली. हिंदुस्थानाशीं मणिपूरचा जुना संबंध असल्याच्या खुणा तेथेंहि दिसतात, पण वेगळेपणा अधिक उठून दिसतो. कठमांडूला पशुपतिनाथ आहे तसा येथें गोविंदजी आहे. नेपाळचे लोक शैव असल्यामुळें आडवें गंध लावतात तर येथें स्त्रियांसकट सर्व माणसें वैष्णव–संप्रदायाची निशाणी म्हणून अगदी नाकाच्या बोंडीपासून टाळूपर्यंत अगरु चंदनाचें गंध लावतात. आपल्याकडेहि आडवें उभें गंध लावणारे शैव वैष्णव आहेत. परंतु तेवढ्यामुळें मणिपुरी लोकांचें वेगळेंपण लपत नाहीं. कसें लपणार ? येथील लोकांची चेहरेपट्टीच मुळीं निर्विवाद मंगोलियन ठेवणीची आहे. तोंडावळा गोल, जाभाडाचीं हाडें रुंद, नाक चिटुकलें, डोळ्यांच्या मासोळ्या जरा तिरप्या, कातडी घोटीव आणि डोळे व केस काळेभोर. पुरुषांपेक्षांहि येथल्या स्त्रियांच्या रंगरूपामुळें त्या प्रदेशाचा निराळेपणा अधिक लक्षांत येतो. कॉलेजांत जाणाऱ्या बहुतेक मुली अनवाणीच चालतांना दिसल्या. लुंगीसारखें एक वस्त्र कमरेभोंवतीं गुंडाळलेलें आणि उपरण्यासारखें एक वस्त्र खांद्यावरून घेतलेलें एवढ्या दोन वस्त्रांचाच त्यांचा पोषाख

असतो. केस पाठीवर मोकळे सडक सोडलेले असतात. कानावर एखादें फूल खोवलेलें असतें. हाच काय तो थाट. पण येथल्या स्त्रियांचीं वस्त्रें निरानिराळ्या रंगांचीं असल्यामुळें सकाळीं नऊ दहाच्या सुमाराला इंफालच्या हमरस्त्यावरून बाजाराकडे, कचेऱ्यांकडे व शाळांकडे जाणाऱ्यायेणाऱ्या स्त्रीपुरुषांची गर्दी झाली कीं विविधरंगी फुलांच्या गेंददार हारासारखे ते रस्ते दिसूं लागतात. 'रस्ते फुलले आहेत' असें वर्णन खऱ्या अर्थानें मणिपूरच्या रस्त्यांचेंच करतां येईल! येथील लोकांचा दुसरा एक विशेष हा कीं त्यांचे चेहरे सदा प्रसन्न नि हसतमुख असतात. मी गेल्या दोन दिवसांत एकहि रडवा किंवा मळमळीत चेहरा पाहिला नाहीं.

येथें प्रत्येक घरांत हातमाग असतो आणि येथील प्रत्येक स्त्रीला विणतां येतें! ज्या मुलीचा हात मागावर चालत नाहीं तिचें येथें लग्न होणें दुरापास्त! अशा प्रकारें घरोघर विणकाम होत असल्यामुळें मणिपुरांत वेगळा असा विणकर समाज अस्तित्वांतच नाहीं. बायका बाजारांतून सूत विकत आणतात आणि त्यापासून आपल्याला हवें तसें कापड विणून घेतात. घराघरांतून दिवसभर धोटा–फणीचा फटक् फटक् आवाज येत असतो. घराभोंवतींच शेती असतें. त्यांत घरांतलीं पुरुषमाणसें खपत असतात. परसांत भाजीपाला पिकवतात. तेथील जमीन उत्कृष्ट आहे. त्यामुळें शेतांत भात जसें उत्तम पिकतें तसाच परसदारच्या वाफ्यांत कोबी, फुलवर, वांगीं, मुळे, गाजरें वगैरे भाजीपालाहि उत्तम पोसतो. परसांत भाजीपाला आहे, घराखालीं शेती आहे, ओसरीवर माग आहे, तळ्यांत मासे आहेत, मग कशाला तोंड वाकडें करून बसावें? अशा वृत्तीचीं येथील माणसें आहेत. आत्मसंतुष्ट

आणि अल्पसंतुष्ट असा हा मणिपुरी समाज शेंकडों वर्षांपासून आजतागायत अविच्छिन्न चालत आलेला आहे.

तीन चार वाजले कीं येथें संध्याकाळ होऊं लागते. मग दिवसभर विणलेलें कापड गवताच्या बुट्टयांत घालून बायका बाजारांत जातात. शुभा, इंफालच्या बाजाराची शोभा मी कधीं विसरणार नाहीं. सगळा बाजार चालवतात बायका. बांगडया, मणि, डूल, नारळाच्या करवंटीचे नक्षीदार हुक्के, अगरु, धूप, भाजीपाला यांचीं छोटीं छोटीं दुकानें हारीनें लागलेलीं असतात. पण खरी शोभा पाहावी तर ती कापडबाजाराची. किती तऱ्हेचें कापड बायकांनीं आणलेलें असतें म्हणून सांगूं ? येथील बायकांना विणण्याचें, धुलाईचें व कशिदा-कामाचें कसब पूर्णपणें अवगत झालेलें आहे. त्यांच्या हातांत काय जादू आहे न कळे; पण त्यांनीं बनवलेले, कोळ्याच्या जाळ्यासारख्या झिरझिरीत कापडाचे एकाहून एक सरस नमुने पाहिले कीं डोळे निवतात. येथील कापडांत अंगची अथवा कशिद्याची जी वेलपत्ती व गोम काढलेली असते तिचे प्रकारहि आपल्याकडच्यापेक्षां अगदीं वेगळे असतात. इकडच्या लोकांना ठळक रंगांचीं व ठसठशीत गोमीची आवड आहे. पण रंगांची जुळणी व गोमींची आंखणी ते अशी करतात कीं पाहणाऱ्याच्या डोळ्यांना त्यांचा ठळकपणा बोंचत नाहीं. सूर्य मावळून अंधार पडला म्हणजे तर इंफालमधल्या ह्या मॅक्स्वेल बाजाराचें दृश्य अद्भुतच दिसूं लागतें. प्रत्येक दुकानासमोर पाइन झाडाच्या सळप्या पेटवून उजेड करण्यांत येतो. आणि अशा शेंकडों दिवटया बाजारभर पेटल्या कीं आपण पुन्हा मार्गशीर्षांत दिवाळी तर पाहात नाहीं ना असा मनाला भास होतो !

चौबाजूंनीं डोंगरांनीं व घनदाट जंगलांनीं वेढा टाकल्यामुळें जगापासून एक प्रकारें अलग पडलेल्या ह्या भागांत माणसें आलीं तरी असतील

कशीं व कोठून ? आणि त्यांच्या ठिकाणीं एवढी कला निर्माण झाली कशी व ती वाढली तरी कशी ? कांही कल्पना करवत नाहीं. इकडच्या नागांच्यासारख्या डोंगरी जमातीमध्येंसुद्धां जणूं उपजत कलाप्रेम वसत आहे. त्याच्या हातात असणारे धाओसारखें सामान्य हत्यार पाहा. कोकणांतल्या शेतकऱ्याच्या कमरेला जसा सदैव कोयता असतो तसाच नागापाशीं धाओ असतो. हातभर लांबीचें बळकट पातें असलेलें हें शस्त्र असतें. पण आपल्या धाओची मूठ नाग मनुष्य कधीं बुच्ची ठेवणार नाहीं. शेळीचे नाहीं तर वनगाईचे केस रंगवून तो त्या मुठींत भरील आणि तिला सजवील. नागाचा भाला फाळाच्या मागें इतका कांहीं बहारदार सजवलेला असेल कीं पाहणारानें म्हणावें, " वारे वा! " त्यांच्या बुट्टया, टोप्या, इरलीं बांबूचीं नाहीं तर वेताचींच बनवलेलीं असतात; पण अशीं सुबक, सफाईदार व बळकट कीं तशीं आपल्याकडे बघावयासहि मिळणार नाहींत.

आणि मणिपुरी लोकांचें नाटय व त्याहिपेक्षां त्यांचें नृत्य काय वर्णावें ! नाटयानृत्याचें ह्या लोकांना जसें कांहीं वेडच आहे. आपल्याकडे मणिपुरी नृत्य अशी सरसकट संज्ञा आपण वापरतों. पण त्यांत लाइ–हरोबा, रास व लोकनृत्य असे तीन प्रकार आहेत. इंफाल-मध्यें गोविंदजींच्या प्रत्येक मंदिरासमोर नाचघर असतें. इकडच्या बहुतेकांना नाटयनृत्याचें थोडेंफार' शिक्षण असतेंच असें म्हटलें तरी चालेल. कोठेंहि नाटय किंवा नृत्य असलें कीं पुरुष, स्त्रिया, मुलें सगळीं येतील. शांतपणानें बसतील. कचरा करणार नाहींत, गोंगाट माजवणार नाहींत, पिचकाऱ्या टाकणार नाहींत. मी कालच ' शांथलेंभी ' नांवाचें नाटक पाहिलें. एका शेतकऱ्याच्या मुलीच्या जीवनाची ही दु:खमय कहाणी आहे. शांतलेंभी हें तिचें नांव. पात्रें अगदीं थोडीं होतीं. तीन तास नाटक चाललें होतें. त्यांतला एकहि

शब्द मला समजला नाहीं. पण रंगमंचावर काय चाललें आहे हें सगळें समजलें. शांथलेंभीचें काम करणाऱ्या मुलीचा अभिनय पाहून मला युकिवारिसूमधील नायिकेची आठवण झाली. आणि शांथ-लेंभीच्या बापाचें काम करणारा नट तर हिंदुस्थानांतल्या पहिल्या प्रतीच्या नटांपैकीं मला वाटला. नाटकाच्या मध्यंतराच्या वेळीं लाइ–हरोबाचा कार्यक्रम होता. लाइ–हरोबा म्हणजे शिव–पार्वतीच्या मीलनाची नृत्यकथा. नाचणारी मुलगी मणिपुरांतील पहिल्या श्रेणीची नर्तिका नव्हती. पण तिच्या नाचण्यांतील सफाई व गोडवा कसा वर्णन करूं ? ती वेलीसारखी वाकत होती, नागिणीसारखी वळत होती. प्रत्येक पवित्र्यागणिक करंगळीपासून पायापर्यंत तिच्या सर्व शरीरांतून एकच लहर दौडत होती. तंबोऱ्याच्या चारी तारा सुरेल मिळवलेल्या असल्या कीं कशा एकमेकींशीं सुसंवाद राखतात; तसा तिच्या देहाचा प्रत्येक अवयव दुसऱ्या अवयवाशीं संवाद राखीत होता. ह्या नृत्य-प्रकारांत भिंगरीसारख्या गिरक्या नाहींत कीं पायांचा थयथयाट नाहीं. आनंदमय खरा, परंतु शांत व संथ असा तो नृत्य-प्रकार मला फार आवडला. अगदीं तन्मय होऊन मीं तें नृत्य पाहिलें.

परवां सकाळीं आपण मणिपूर सोडणार, हा विचार मनाला फारसा आनंद देणारा नाहीं. चित्रांगदेचें हें माहेर मी मनानें रंगवीत होतों तेव्हां तर मनोहर होतेंच, पण आतां प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहात आहें तेव्हांहि मला मनोहरच वाटत आहे. मी कल्पना करीत होतों त्याहिपेक्षा सुंदर वाटत आहे ! मी मनांत म्हणतों आहे कीं मणिपूरचें हें रानफुलासारखें नाजुक पण टवटवीत आणि साधें भोळें पण रम्य सौंदर्य असेंच टिकून राहो !

तुझा

**नाना**

इंफाळ, मणिपूर २६।११।५२



## १३ : आपला शेजारी : ब्रह्मदेश

प्रिय शुभा,

पुण्याहून उठून रंगूनसारख्या दूर शहरीं जर जावयाचें तर ४ जानेवारीचा ब्रह्मी लोकांचा स्वातंत्र्यदिन तरी साधावा म्हणून आम्ही कलकत्त्यास उतरल्यापासूनच खटपटीला लागलों. सुदैवानें सगळ्या गोष्टी मनासारख्या जमत गेल्या आणि डमडमच्या प्रशस्त विमानतळावरून आमच्या विमानानें दुपारीं १॥ वाजतां भरारी मारली. त्या दिवशीं आकाश अगदीं निर्मळ होतें. त्यामुळें सात हजार फुटांवरून आमचें विमान चाललेलें असतांनासुद्धा खालच्या जमिनीचा पृष्ठभाग स्पष्ट नजरेस पडत होता. विमानतळ सोडल्यापासून सुमारें अर्ध्या तासांत आम्ही सुंदर बनावर आलों. तेथें शेंकडों मुखांनीं भागीरथी पूर्व-समुद्रास मिळते. पुराणांत यासंबंधीं अशी कथा सांगितलेली आहे कीं सगर राजाचे शेंकडों पुत्र कोणाच्या तरी शापानें भस्म होऊन येथें पडलेले होते. देवसरिता गंगेच्या पाण्याचा स्पर्श झाला तरच ते पावन होणार होते. पण इहलोकांत तिचें

पाणी मिळणार कसें? एवढें सामर्थ्य होतें कोणांत? शेवटीं भगीरथ राजानें गंगेला स्वर्गांतून पृथ्वीवर आणली आणि तिच्या पाण्याचा स्पर्श होतांच ते मृत देह पावन झाले. भगीरथानें गंगा पृथ्वीतलावर आणली म्हणून तिला भागीरथी म्हणजे भगीरथाची जणू कन्याच असें लोक म्हणूं लागले. असो. सुंदरबन मागें टाकल्या-नंतर ब्रह्मदेशाचा किनारा लागेपर्यंत आम्ही सुमारें दीड तास समुद्रा-वरूनच उडत होतों. भोंवतालीं स्वच्छ निळें आकाश आणि खालीं निळसर हिरवा दर्या!

अक्याबच्या विमानतळावर आम्हीं १०–१५ मिनिटेंच थांबलों असूं. तेथून उड्डाण केल्यावर विमानानें थेट रंगूनकडे मोहरा फिरवून झपाट्यानें मार्ग कापण्यास सुरुवात केली. सुमारें तासाभरानें सूर्यप्रकाश मंद होत चालला आणि खालच्या भूभागावर आणि आकाशाच्या फलकावर संध्याकाळचे रंग भराभर पसरूं लागले. खाली नदीच्या पात्रांतून चमकणाऱ्या जलौघांची झळाळी कमी कमी होऊं लागली आणि गर्द झाडींत लपल्यामुळें इतका वेळ निळे दिसणारे डोंगर प्रथम जांभळे–तपकिरी आणि नंतर हळूहळू काळे दिसूं लागले. अमळशानें सूर्याचा लालभडक गोळा एकदम विझून गेला आणि मग एखाद्या प्राथमिक शाळेच्या संमेलनाच्या वेळीं नाटकाचा पडदा वर जाण्याच्या आधीच बालनट जसे पडद्याच्या आडून हळूच डोकावून पाहतात त्याप्रमाणें चारदोन चांदण्या आकाशपटाआडून आमच्याकडे डोकावून पाहूं लागल्या. पाहतां पाहतां मागें रेंगाळत राहिलेला उरला सुरला सगळा प्रकाशहि नाहींसा झाला आणि काळोखाच्या अथांग समुद्रांतून आमचें विमान काजव्याप्रमाणें लुकलुकत उडत राहिलें.

संध्याकाळीं ६॥ चे सुमारास रंगूनमधील दिवे लांब काळोखांतून डोळे मिचकावतांना आम्हांला दिसले. ते दिवे रंगूनमधल्या सर्वांत उंच असलेल्या श्वे–डेगॉन पॅगोड्याच्या शिखरावरचे होते कीं सुले पॅगोड्याच्या शिखरावरचे होते तें मला सांगतां येणार नाहीं. निरभ्र आकाशामध्यें कृत्तिका नक्षत्राचा पुंज जसा दिसतो तसेच ते सुंदर दिसत होते एवढें मात्र खरें. आणखी १५–२० मिनिटांनीं आम्ही रंगूनच्या विमानतळावर उतरलों. विमानतळापासून रंगून शहर पुष्कळच लांब आहे. रस्त्यानें जातांना ठिकाठिकाणीं दुसऱ्या दिवशींच्या स्वातंत्र्यदिनानिमित्त जी आरास चाललेली होती, ती आम्हांला सहजच पाहावयास मिळाली. रंगूनचें मध्यवर्ति ठिकाण जो बंदूला चौक त्याच्या जवळच आमची उतरण्याची सोय करण्यांत आलेली होती. हा बंदूला चौक म्हणजे मुंबईच्या आझाद मैदानासारखेंच एक विस्तीर्ण मैदान असून त्याच्या मध्यभागीं ब्रह्मदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं ज्यांनीं बलिदान केलें त्यांचें स्मारक म्हणून उभारलेला शुभ्र संगमरवराचा एक पंचधारी स्तंभ आहे. ह्या मैदानाच्या भोंवतीं रंगून कॉर्पोरेशनची भव्य इमारत, सुले पॅगोडाचें नाजूक बांधणीचें मंदिर आणि मोठमोठ्या पेढ्या वगैरेंचे इमले आहेत.

४ तारखेला भल्या पहाटेपासूनच स्वातंत्र्यदिनाच्या उत्सवाला प्रारंभ झाला. अशा राष्ट्रीय उत्सवाच्या प्रसंगीं ब्रह्मदेशामध्यें सेडाँ (एक प्रकारची भेरी किंवा डंका) वाजविण्याचा प्रघात आहे. सेडाँचा गंभीर ध्वनि सकाळच्या वातावरणांत घुमत होता आणि बंदूला चौकांत रंगूनमधील हजारों स्त्री–पुरुष नागरिक लष्कराची कवाईत पाहण्यासाठीं एकत्र जमत होते. ब्रह्मदेश हें एक चिमुकलें

राष्ट्र आहे. सबंध ब्रह्मदेशाची लोकसंख्या अवघी पावणे दोन कोटि भरेल. त्याची लोकसंख्या जशी छोटीशी तसेंच त्याचें उत्पन्नहि छोटेंसेंच आहे. त्यामुळें दिल्लीला किंवा मुंबईला जशा प्रकारचीं सैनिकांचीं संचलनें किंवा मानवंदना होतात तशा प्रकारचीं संचलनें व मानवंदना येथें होणें शक्य नसतें. परंतु त्या दिवशींच्या समारंभांत ज्या ब्रह्मी दलांनीं भाग घेतला त्यांनीं आपापलीं कामें अतिशय शिस्तीनें आणि नीटनेटकेपणानें केलीं यांत संशय नाही.

सायंकाळीं आम्ही श्वे–डेगॉन पॅगोडा पाहावयास गेलों. पॅगोडा म्हणजे बुद्धाचें मंदिर. ब्रह्मदेशांतली बहुसंख्य जनता बुद्धधर्मीय आहे. गांवोगांव झाडींतून डोकें उंच काढलेलीं पॅगोडांचीं शिखरें आपल्या नजरेस पडतात. पण रंगूनच्या श्वे-डेगॉन बुद्ध मंदिराचें माहात्म्य या देशांत विशेषच आहे. श्वे–डेगॉन हा शब्द श्वे आणि डेगॉन या शब्दांच्या जोडणीनें बनलेला आहे. डेगॉन हें रंगूनचें जुनें नांव आणि श्वे म्हणजे सुवर्ण. या मंदिराचें शिखर खरोखरच सोन्यानें मढविलेलें असून तें उन्हामध्यें झळाळत असतें. पायापासून शिखरापर्यंतची या बुद्ध मंदिराची उंची ३२६ फूट म्हणजे आपल्या पर्वतीच्या टेकडीपेक्षांहि ५०।७५ फूट अधिकच भरेल. शिखराचा आकार एवढा भव्य असून देखील तें मुळींदेखील बोजड दिसत नाहीं, ही त्याच्या बांधणीमधील विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट मला वाटली. या मुख्य शिखराच्या भोंवतीं त्याच आवारांतल्या इतर छोट्या छोट्या मंदिरांचीं शिखरें आकाशांत चढत गेलेलीं दिसतात. मुख्य शिखर आणि भोंवतालचीं त्याहून ठेंगणीं पण त्याच नमुन्याचीं चार पांच शिखरें यांचा हा मेळ दृष्टीला मोठा मनोरम वाटतो. देवळाचें सर्व आवार अगदीं

स्वच्छ राखलेलें असतें. प्रवेशद्वारापर्यंत दुतर्फा सुंदर सुगंधित फुलांचे गुच्छ, कागदाच्या चित्रविचित्र कातरकाम केलेल्या पताका आणि मेणबत्त्या यांचीं दुकानें थाटून ब्रह्मी स्त्रिया बसलेल्या असतात. आपल्याकडे न आढळणारी सोनटक्क्यांच्या फुलांची एक सुंदर जात मला येथें दिसली. देवळांत येणाऱ्या भाविकांपैकीं कोणी फुलें घेतो, कोणी मेणबत्त्या घेतो तर कोणी पताका घेतो. मंदिरामध्यें बुद्धमूर्तीच्या समोरे मोठमोठ्या नक्षीच्या फुलदाण्या ठेवलेल्या असतात. त्यांत बरोबर आणलेलीं फुलें भाविकानें खोचून ठेवावयाचीं असतात. पानाफुलामध्यें देवाची मूर्ति बुडवून टाकण्याचा प्रघात इकडे नाहीं. देवमूर्तीसमोर सुंदर पानाफुलांनीं भरलेल्या फुलदाण्या, छोटया छोटया मेणबत्त्या व कागदाच्या नक्षीदार पताका मांडण्यांत आल्यामुळें मंदिरांतील दृश्य मोठें सुंदर दिसतें.

ह्या बुद्ध मंदिराच्या मुख्य गाभाऱ्यावर फारसें नक्षीकाम केलेलें आढळून आलें नाहीं. परंतु प्राकारामध्यें जीं इतर छोटीं मंदिरें आहेत त्यांचे खांब व जाळया धातूच्या व लाकडाच्या कोरीव कामानें भरून गेलेल्या आहेत. कांहीं मंदिरांच्या प्रवेशद्वारापाशीं उभे ठाकलेले द्वारपाल पाहून तर मी चकितच झालों. ते लाकडाचे बनविलेले होते, पण पंचरसी धातूच्या मूर्तीप्रमाणें दिसत होते. इतक्या सुंदर लांकडाच्या मूर्ति मी आजवर पाहिलेल्या नाहींत. प्रवेशद्वारापाशीं जयविजयाप्रमाणें दोन्ही पुरुषांच्या प्रतिमा न मांडतां एक पुरुषाची व एक स्त्रीची प्रतिमा ठेवण्याची पद्धत येथें आढळली. ब्रह्मदेशासारख्या स्त्रीपुरुषांना समान अधिकार देणाऱ्या देशांत असें आढळलें नसतें तरच नवल. मूर्तींच्या अवयवांची प्रमाणबद्धता, त्यांची उभे राहण्याची

ऐट हीं सगळीं पाहण्यालायक होतीं. नक्षीमध्यें कमालीचा बारीक-सारीक तपशील भरण्याची हौस इकडच्या कारागिरांना वाटत असावी. पण इतकें बारीक तपशिलाचें नकास काम सगळीकडे केलेलें मला फारसें आवडत नाहीं. लेणीं, मंदिरें, राजप्रासाद इत्यादि भव्य आकाराच्या इमल्यावर कमींत कमी ठळक रेषांच्या साहाय्यांनीं निर्माण केलेले परिणाम मला अधिक पसंत पडतात.

सायंकाळ झाली तशी स्वातंत्र्यदिनाच्या खऱ्या उत्साहाला भरती आली. मला वाटतें त्या दिवशीं घरामध्यें कोणी चूल पेटविलीच नसावी. झाडून सर्व माणसें सणासुदीचे पोषाख करून घोळक्या-घोळक्यांनीं रस्त्यांतून हिंडत होतीं. ब्रह्मी लोकांना आवडणाऱ्या खाद्य-पेयांचीं दुकानें फुटपाथवर हारीनें लागलेलीं होतीं आणि हजारों स्त्री–पुरुष चौ चौ खात मजा करीत बसले होते. सबंध रंगून शहरभर रंगीबेरंगी दिव्यांच्या माळा पसरलेल्या होत्या. मोठमोठ्या झाडांच्या पालवीमधून शेंकडों दिवे चमचमत होते. चौकाचौकांतून नाच-गाणीं सुरू होतीं. बंदूला मैदानावर तर माणसांची नुसती खेचाखेच होऊन गेली होती. काचिन–नृत्य, शान–नृत्य असे लोक-नृत्यांचे अनेक-विध प्रकार आम्हांला तेथें पाहावयास मिळाले. पण ब्रह्मी लोकांचें संगीत, त्यांचें वाद्यवादन अथवा नृत्य यांपैकीं मला कांहींच मनापासून आवडलें नाहीं. त्यांच्या वाद्यवादनांत व संगीतांत निष्कारण आरडा-ओरड आणि कठोर आवाज फार आहेत. संगीत चालू असतांना चिरलेल्या बांबूचा फट् कट् असा आवाज ते काढतात किंवा फुर्रदिशीं शिट्टी वाजवितात. त्यामुळें रंगाचा बेरंग होऊन जातो. ब्रह्मी नृत्याची तुलनाहि आपल्याकडील भारत नाटय, कथ्थक किंवा मणिपुरी

नृत्याशीं होऊं शकणार नाहीं. परंतु इतक्या त्रोटक परिचयावरून ब्रह्मी कलेबद्दल निर्णय देणें योग्य होणार नाहीं याची मला जाणीव आहे. ब्रह्मी लोकांचीं वाद्यें मात्र अतिशय सुंदर प्रकारें सजविलेलीं असतात.

ब्रह्मी वाद्यांतील मुख्य वाद्यें दोन. एक आपल्याकडील तबलातरंगासारखें २०–२२ तबले अर्धवर्तुळाकार मांडलेलें वाद्य आणि दुसरें ढोल. तबलातरंग एका वर्तुळाकार लाकडी मखरांत मांडलेला असतो आणि त्यांत मध्यभागीं बसून वादनकार तें वाद्य वाजवतो. हें लाकडी मखर सोन्याचा रंग देऊन आणि मिन्याचें काम करून खूपच सजवलेलें असतें. ढोल ज्या लाकडी घोडीला टांगलेला असतो तीसुद्धां अशीच सजवलेली असते. कोठें तिला शरभाचा आकार दिलेला असेल तर कोठें मोराचा. मोराच्या आकृति ब्रह्मदेशांत अनेक ठिकाणीं आढळतात कारण मोर हें ब्रह्मदेशाचें राष्ट्रीय चिन्हच आहे.

ब्रह्मी लोकांच्या उत्सवप्रियतेला मात्र क्वचितच तोड मिळेल. शुभा, हा कांहीं त्यांचा पहिलाच स्वातंत्र्यदिन नव्हता. ब्रह्मी लोक स्वतंत्र होऊन पांच वर्षे लोटलीं आहेत. पण त्यांच्या स्वातंत्र्यदिनाच्या मानानें आपल्याकडचा स्वातंत्र्यदिन अगदीं फिका वाटतो. आपल्याला स्वातंत्र्य गेल्याचीहि फिकीर नाहीं आणि मिळाल्याचीहि महति नाहीं ! ब्रह्मी लोकांचें आमच्या उलट आहे. ते स्वभावत:च आनंदी आणि उत्सवप्रिय आहेत. मग आज तर काय बोलून चालून स्वातंत्र्योत्सवाचा पहिला दिवस !

ब्रह्मदेशामध्यें स्त्रीपुरुषांत संपूर्ण समानता आहे. जातिभेदांना तेथें मुळींच थारा नाहीं. त्यामुळें समाजामध्यें एकजीवपणा आणि मोकळेपणा अधिक आलेला आहे. आपल्याकडे ज्याप्रमाणें प्रत्येक जाती–

पोटजातींभोंवतीं रूढींचीं कुंपणें पडलेलीं असतात, तसें तेथें कांहींच नाहीं. याला शिवूं नको, त्याच्या घरीं जाऊं नको असले माणसाला माणसापासून तोडणारे भेद नाहींत. भगवान् बुद्धानें ही फार मोठी कामगिरी करून ठेविलेली आहे. माझ्या पुष्कळदां मनांत येतें कीं बुद्ध भगवान् आपल्या देशांत जन्मले, त्यांनीं आपल्या धर्माची शिकवण प्रथम आपणासच दिली; पण त्यांनीं आमच्या हातीं जो चिंतामणि दिला त्याला गार समजून आम्हीं तो दूर भिरकावून दिला, हें शहाणपणाचें झालें नाहीं.

ब्रह्मी मुलांमध्यें वेताच्या चेंडूचा एक खेळ फार लोकप्रिय आहे. वेताचे तीन किंवा चार पदर घेऊन चेंडू विणतात आणि फक्त पायाच्या स्पर्शानें तो सारखा उडता ठेवतात. चेंडू जमिनीला टेकूं द्यावयाचा नाहीं आणि त्याला हात लावावयाचा नाहीं. काय विलक्षण चपळाईनें ब्रह्मी मुलें हा खेळ खेळतात म्हणतेस ! संध्याकाळीं मुलें शाळेंतून आलीं आणि तरुण मोलमजुरी करून घरीं परतले कीं कोपऱ्याकोपऱ्यावर हा खेळ सुरू होतो. चार पांच माणसें कडें करतात कीं झाला खेळ सुरू.

ब्रह्मी स्त्री–पुरुष वागण्यांत फार साधे सरळ आहेत. येथल्या बायकांना केस निरनिराळ्या प्रकारें शृंगारण्याची मात्र अतिशय आवड आहे. केशरचनेचे आणि फुलें केसांत घालण्याचे कधीं न पाहिलेले प्रकार येथें पाहावयास मिळतात. तुम्हां मुलींना ह्या केशरचनेच्या व पुष्परचनेच्या पद्धति खासच आवडतील. तुझी आई ब्रह्मी मैत्रिणींकडून हें सारें शिकून घेत आहे. तेव्हा आपणाला रंगूनला नेलें नाहीं म्हणून तुला हळहळ वाटावयास नको.

तुझा

**नाना.**

रंगून ५।१।५३

  

प्रिय शुभा,

काल दुपारच्या गाडीनें इकडे येण्याचें ठरवून स्टेशनावर आलों खरा पण गाडींत पाऊल टाकल्यावर क्षणभर मनांत असा विचार आला कीं असेंच माघारीं जावें आणि दुसऱ्या दिवशीं सकाळच्या शांत वेळीं गाडी पकडावी. गाडी अशी कांहीं तापली होती म्हणतेस ! अंगांतून घामाच्या धारा निथळत होत्या. पण डब्यांत जागा जरा ऐसपैस आणि उन्हाच्या उलट बाजूच्या खिडकीशीं मिळाली, तिचाहि मोह सोडवेना. तेव्हां घरीं परतण्याचा विचार खिडकीबाहेर सोडून दिला आणि त्याच गाडीनें मुंबईस आलों.

आणखी सुदैव असें कीं गाडींत ओळखीचें कोणी भेटलें नाहीं. पुण्यामुंबईच्या छोटया व जलद प्रवासांत ओळखीची व्यक्ति न भेटली तर बरी असें मला अनेकदां वाटतें. पण माझ्या मनासारखें घडतें मात्र शंभरांतून एखाद्याच वेळीं. म्हणून असा कपिलाषष्ठीचा योग लाभला कीं मला आनंद होतो. गाडीमध्यें ओळखीचें कोणी नसलें

कीं सगळा वेळ आपला. मग हवे तर झोपेचे घुटके घेत घेत प्रवास करावा किंवा भराभर पळणारीं झाडें, टेंकाडें, तारेचे खांब आणि दूरचे निळे डोंगर मुकाटयानें बघत बसावें. अथवा पिशवींत एखादें पुस्तक असलें तर तें निर्वेधपणें वाचावें, अगदीं चाखीत चाखीत वाचावें. वाचतांना हंसूं आलें तर खुशाल हंसावें; एखादा रम्य विचारांचा गुच्छ नजरेस पडून मन पुलकित झालें, तर बाहेरच्या हिरव्यागार शेतांच्या रम्यतेशीं पुस्तकांतल्या रम्यतेची तार जुळवून त्यांचा जोडसूर डोळे मिटून स्वस्थ ऐकत बसावें, आणि कोठें एखादें उच्च भव्य विवेचन वाचनांत आलें तर बाहेरच्या गगनचुंबी पर्वत-शिखरांशीं तें तोलून पाहावें. या गोष्टी ओळखीचा इसम शेजारीं असला कीं करतां येत नाहींत. तुम्ही हंसलांत कीं तो विचारणार "कां रे हंसलाससा ? फार विनोदी आहे वाटतं पुस्तक ?" आणि एवढ्यावरच तो थांबेल असेंहि नाहीं. "जरा मला पाहूं दे" असें म्हणून तो तें तुमच्या हातांतून काढून सुद्धां घेईल. बरें वाचतां वाचतां तुम्ही गंभीर झालांत तरी तो म्हणणारच कीं "एवढा गंभीर कशानं झालास ?" तात्पर्य, अशा प्रसंगीं कोणी ओळखीचें मनुष्य भेटलें कीं प्रवासाची सगळी मजा बिनसून जाते. तेव्हां डब्यांत ओळखीचें कोणी नाहीं अशी खात्री झाल्यावर मी मोठ्या खुशींत येऊन आपलें आसन जमवलें आणि बरोबर आणलेलें पुस्तक पिशवींतून बाहेर काढलें.

पुस्तक होतें कोल्हापूरच्या डॉक्टर श्रीखंड्यांनीं रचलेलें 'सुश्लोक-मानस.' संत तुलसीदास नामक एक प्रख्यात भक्त–कवि उत्तर प्रांतांत सुमारें चारशें वर्षांपूर्वी होऊन गेले. त्यांनीं 'रामचरितमानस'

हा ग्रंथ रचला. हा ग्रंथ उत्तरभारतामध्यें घरोघर वाचला जातो. त्यांतील बालकांडाचा डॉक्टरांनीं केलेला हा अनुवाद आहे. शुभा, मर्यादा पुरुषोत्तम राम आणि पूर्णावतार भगवान् कृष्ण हीं भारताचीं आराध्य दैवतें आहेत आणि रामायण व महाभारत हें आपल्या देशाचें अक्षय्य साहित्य आहे. गेल्या तीन हजार वर्षांत आपल्या देशामध्यें नानाप्रकारचे उत्पात झाले पण भारतीयांना राम–कृष्णांचा विसर कधींहि पडला नाहीं. ते जेथें जेथें गेले तेथें तेथें राम-कृष्णांच्या कथा त्यांनीं आपल्या समवेत नेल्या आणि त्या पसरवल्या. कांबोज, जावा, सुमात्रा, बलिद्वीप येथपर्यंत पूर्व महासागरांत या कथा पोंचलेल्या असून तेथील देवळाच्या शिल्पांमधून त्यांतील प्रसंग खोदलेले आढळतात, आणि तेथील लोकांच्या नृत्यांतून ते प्रकट केले जातात. भारतामध्यें तर एकहि अशी भाषा नसेल कीं जिच्यांत राम-कृष्णांच्या कथांवर काव्यें रचलेलीं नाहींत.

मी तुझ्या वयाचा होतों तेव्हां श्री. यादव शंकर जामदार यांनीं याच ग्रंथाचें केलेलें गद्य भाषांतर वाचलें होतें, आणि मला त्यांत वर्णिलेली रामकथा अतिशय आवडली होती. दाशरथी रामाचें मला अजूनहि खूप आकर्षण वाटतें. तेव्हां डॉक्टरांचा पद्यानुवाद कसा काय उतरला आहे तें पाहण्याची मनांत उत्सुकता होतीच. शिवाजीनगर स्टेशनमधून गाडी पुढें सरकली आणि मीं जें पुस्तक उघडलें तें माटुंगा मागें टाकून गाडी दादर स्टेशनवर येण्यासाठीं वेग आवरता घेऊं लागली तेव्हा मिटलें. यावरून त्या पुस्तकाच्या हृदयंगमतेची तुला कल्पना येईल.

पूर्वीच्या बहुतेक सर्वच कवींप्रमाणें तुलसीदासहि पाल्हाळिकच

आहेत, नाहीं म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. प्रत्यक्ष रामकथेला प्रारंभ करण्याच्या आधीं अवांतर कथांची जी लांबण त्यांनीं लावलेली आहे ती तूं वरवर चाळलीस तरी पुरे. आपल्याकडे देवदेवता शेंकडयांनीं आणि प्रत्येकाचे भक्तगण निरानिराळे. हे भक्तगण आपसांत भांडत आणि देवांनाहि आपापल्या कल्पनेप्रमाणें भांडावयास लावीत! शिवाचे भक्त ते शैव आणि विष्णूचे ते वैष्णव. त्यांचें परस्परांशीं वैर म्हणून त्यांनीं शिवाचें विष्णूशीं वैर लावून दिलें. या त्यांच्या कल्पना बदलाव्या यासाठीं ज्यांनीं हरिहर–प्रेमाच्या कथा लिहिल्या त्यांपैकींच संत तुलसीदास होत. म्हणून रामचरिताला आरंभ करण्यापूर्वी काशी-निवासी महादेव व अयोध्यानिवासी राम यांची एकमेकांवर केवढी भक्ति होती तें दाखवण्यासाठीं तुलसीदासांना एवढें भारूड रचावें लागलें आहे. खरी राम–कथा सुरू होते ती एकतिसाव्या तरंगापासून. बालकांडापैकीं खरा महत्त्वाचा भाग येथून सुरू होतो. रामलक्ष्मणा-दिकांचा जन्म, त्यांचें बालपण व शिक्षण, ताटकेचा वध, अहिल्यो-द्धार, शिवचाप–भंग, राम–सीता–विवाह, राम–परशुराम संवाद, इतके विषय या कांडांत स्थूल मानानें येऊन गेले आहेत. कवि तुलसी-दासांची श्रीरामचंद्राच्या ठायीं नुसती भक्ति नाहीं प्रेम, आहे. त्यामुळें हे विविध प्रसंग वर्णन करीत असतां त्यांची काव्यशक्ति उचंबळून आलेली आहे. दशरथ, कौसल्या, राम–लक्ष्मण, जानकी, अयोध्येचे व मिथिलेचे स्त्री–पुरुष नागरिक, परशुराम यांचीं स्वाभाववर्णनें तुलसीदासांनीं अशा कांहीं कुशल लेखणीनें केलीं आहेत कीं तीं वाचतांना मन गुंग होऊन जातें, आणि प्रत्येक व्यक्तीच्या निराळे-पणाची जाणीव आपल्याला होते.

रामजन्माच्या आधींचा वाकणावळणांचा व पाल्हाळाचा भाग तूं वरवर चाळलास तरी चालेल असें मीं म्हटलें. पण त्यांतहि कांहीं फार सुंदर काव्य येऊन गेलेलें आहे. तुलसीदास भक्त असले तरी त्यांना विनोदाचें वावडें नसावें असें दिसतें. उदाहरणार्थ पार्वतीच्या विवाह-प्रसंगाचें वर्णन चालू आहे, तें पाहा.

हिमालय हा पार्वतीचा पिता. त्यानें घातलेल्या मंडपाची शोभा काय वर्णावी ? सगळे देव, यक्ष, किन्नर तेथें सहकुटुंब सहपरिवार लग्नसोहळ्यासाठीं जमले आहेत. इकडून श्रीशंभूची स्वारी लग्नमंडपाकडे निघाली आहे.

भालीं शशी सुंदर, शीर्षिं जाह्नवी ।
त्रिनेत्र, कंठस्थलिं ती विषच्छवी ॥
वक्षःस्थलीं ती नररुंडमालिका ।
अमंगला मंगलधाम झालि का !
त्रिशूल हस्तीं, डमरूहि साजला ।
नंदीवरी बैसुनि शंभु चालला ॥
अनेक वाद्यध्वनि वाजुं लागती ।
वेषें अभद्रा परि भद्र मूर्ति ती ॥

अशा त्या उग्रमंगल शंकरांच्या समवेत त्यांचे गण होते ते कसे ?

कोणा नसेचि मुख, कोण महामुखाचे ।
कोणी अपाद, कुणि पाणिविहीन साचे ॥
कोणा अनेक कर, कोण अनेकपाद ।
कोणा अनेक नयनें कुणि पूर्ण अंध ॥

असा हा विचित्र वरघोडा जेव्हां लग्नमंडपाच्या प्रवेशद्वारापाशीं पोचला तेव्हां:

आलोकिती शिवगणांसह जेधवां ते ।
तद्वाहनें भिउनियां पळती समस्तें ॥
जे पोक्त वृद्ध जन ते न त्यजीति धीर ।
पोरें परी पळुनि जाति घरीं समग्र ॥
तेव्हां तयांस पुसती गृहिं आइबाप ।
तीं देति उत्तर अशीं सहभीतिकंप ॥
" हो ! काय सांगुं ? वरणें तरि काय आतां ?
हें का वऱ्हाड ? अथवा यमसैन्य ताता ॥
वेडाच कीं वर सवार वृषावरी तो ।
जो भस्म, भूषण, कपाल अही धरीतो ? "

हें वर्णन वाचल्यावर तुलसीदासांचें निरीक्षण किती बारीक होतें व त्यांची विनोदबुद्धि कशी जागती होती त्याची साक्ष पटते.

रामजन्मानंतर रामचरिताची कथा सरळ धावूं लागते. तिच्यांत मग गुंतागुंत नाहीं. आश्विनकार्तिकांतल्या नदीप्रमाणें तिचा ओघ भरपूर, स्वच्छ व शीतल वाटतो. राम आणि लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न " जोड्या अशा श्यामल गौर दोन्ही । माता मनीं हर्षलि त्या बघोनी; पण " त्यांतूनहि परमसौख्य–महासमुद्र । अत्यंत सुंदर मनोहर रामचंद्र ! " असें रामाचें वर्णन करतांना कवि जणूं वेडा होऊन गेला आहे. तो लिहितो—

ते कर्ण सुंदर, मनोहर ते कपोल ।
ते बोबडे मृदुल लाडिक गोड बोल ॥

नीलांबुजद्युति विशाल विलोचनाभा ।
भ्रू वक्र, भाल धरि पिंपळपानशोभा ॥
ते स्निग्ध केश कुरळे शिरिं कृष्णकांति ।
माता जया करित नीट पुनः पुन्हा ती ॥
अंगीं झगा पहिरला पिवळा असा तो ।
रांगूनि जानुकरिं राम विमोहवी तो ॥

तुलसीदासजींच्या काव्याची महती मला विशेष वाटली ती त्यांची स्वभावपरिपोष करण्याची शक्ति पाहून. सीतास्वयंवराच्या मंडपांत प्रभु रामचंद्र धनुर्भंग करतात त्या वेळचीं जनक, लक्ष्मण, सीता, रामचंद्र यांचीं शब्दचित्रें त्यांनीं अशा कांहीं जिवंत लेखणीनें चितारलीं आहेत कीं जणूं कांहीं अजिंठ्याच्या भिंतीवरील रंगचित्रेंच आपणांसमोर उभीं आहेत असें भासावें. शेंकडों अतिरथी महारथी राजे त्या अतिप्रचंड धनुष्याला दोरी चढवण्यासाठीं झटतात. पण व्यर्थ. पराजित व अवमानित होत्साते बिचाऱ्यांना परतावें लागतें. कारण :

तें शंभु कार्मुक तसें स्थिर वाटलें कीं ।
जैसें सतीमन पळे नच कामिभाकीं ॥

एकाहि वीराकडून तें धनुष्य चढवलें जात नाहीं हें पाहून तेथें जमलेल्या नृपतींना राजा जनक विषण्णपणानें पण लागऱ्या शब्दांत म्हणतो :

प्रौढी इथून न करो कुणि "मीच वीर" ॥
निर्वीर मी समजतों धरणी समग्र ॥
आपापल्या गृहिं चला त्यजुनी मनीषा ।
सीताविवाह विधिनें लिहिला न तैसा ॥

पृथ्वी निर्वीर झाली असे शब्द जनकाच्या तोंडून ऐकल्याबरोबर लक्ष्मणाला ते सहन होत नाहींत. तो ताडकन् उठून रामाला म्हणतो :

" आज्ञा मिळेल तुमची जर अल्प मातें ।
ब्रह्मांड चेंडुपरि मी उफळीन हातें ॥
त्या हें पिनाक मग काय जि ! जीर्णदंड ? "

रामचंद्र त्याला गप्प राहण्यास खुणावितात आणि विश्वामित्राची अनुज्ञा घेऊन ते स्वतःच उठतात. यापुढचें वर्णन किती ठसकेदार आहे बघ.

ठाके राम उठोनि चारु सहज
स्वाभाविकें लाघवें ॥
स्वश्रीनें मृगराजशावहि
तयें लाजीवला राघवें ॥

पण धनुष्य पेलण्यासाठीं राम उठला हें पाहून सीतेचा जीव इकडे घाबरा झाला ना ? केवढें तें धनुष्याचें धूड अन् केवढासा हा सुकुमार किशोर ! तिनें धनुष्याची प्रार्थना केली, " बाबारे, आपलें अंग हलकें कर ! "

प्रभूसि पाहे अवनीकडे पुन्हा ।
विलोल नेत्रां बघुनी गमे मना ॥
शशांक बिंबांतरि रम्य डोलतें ।
रतीश्वराचें जणु मीनयुग्म तें ॥

प्रभुरामला सीतेच्या मनःस्थितीची बरोबर कल्पना होती. तो शिवधनुष्यापाशीं जाऊन उभा राहिला. त्यानें एकदां सीतेकडे आणि एकदां धनुष्याकडे पाहिलें.

सीतेतें अवलोकुनी निरखिलें
श्रीशंभुच्या कार्मुका ।
वाटे पाहतसे जणों खगपति
व्यालाचिया बालका ।।

रामप्रभूनें जाणलें कीं व्याकुळ झालेल्या सीतेला हा मानासिक ताण फार वेळ सहन होणार नाहीं. त्यानें क्षणांत शिवधनुष्य उचललें, वाकवलें, त्यावर दोरी चढवली आणि तें आकर्ण खेचून मोडलें सुद्धा.

प्रभूनें दोनही चाप–खंड भूवरि फेकिले ।।

आणि मग ? मग आली रामाला जयमाला घालण्याची वेळ. सख्या सीतेला घेऊन रामाकडे निघाल्या. सीतेची स्थिति कवि वर्णन करतो आहे :

संकोच देहिं तिचिया, परि थोर हर्ष ।
ती गूढ चित्तरति जी न कळे कुणास ।।
जाऊनि रामनिकटीं बघि रामकांति ।
तैं भासली लिखित चित्रसुमूर्तिका ती ! ।।
पाहोनी तरि ती मनःस्थिति तिची
तीतें सख्या बोलती ।
" बाळे गे ! जयमाळ सुंदर गळां
तूं राघवा ! घाल ती ।। "
ऐकोनी वच पाणि पद्मयुगुलें
ती उंचवी माळ ती ।
प्रेमानें विवशा करांतुनि अशा
ना ती सुटे खालती ।।

हें वर्णन मीं वाचलें आणि मी मनांत म्हणालें, "वा, तुलसीदासजी, तुम्ही कमाल केलीत इथं. धन्य आहे तुमची लेखणी !"

असाच पण अगदीं निराळ्या मनोभावनांचा प्रसंग यापुढें कवीनें चितारला आहे. शिवधनुष्य भंगल्यावर त्याचा ध्वनि ब्रह्मांडांत कोंदाटला. तो ऐकून महाकोपी परशुराम तेथें पातले. त्या वेळीं रागानें जळणारा वृद्ध परशुराम, त्याची कुचाळी करणारा धिट्ट लक्ष्मण आणि धीरगंभीर रामचंद्र हीं तिन्ही पात्रें तुलसीदासजींनीं अशा चतुराईनें रेखाटलीं आहेत कीं त्याला तोड नाहीं. लक्ष्मणाची अनावर धिटाई वाचून मलासुद्धां त्याचा राग आला ! तो चिमुरडा मुळीं सुरुवातच कशी करतो बघ :

" आम्ही कितीक धनु शैशवि तोडियेलीं ।
स्वामीसि कां न कधिं येवढि लालि आली ?
कां याच चापिं ममता इतुकी असे ही ? "

आणि सुरुवातच अशी झाल्यावर परशुरामाचा क्रोधाग्नि पुढे किती भडकला असेल त्याचा विचार कर. भार्गवरामाचा व लक्ष्मणाचा हा संवाद वाचतांना तलवारीवर तलवार पडून ठिणग्या उडताहेत असा भास होतो. शेवटीं या वाग्युद्धाचा परिहार रामचंद्र करतात. त्यांचें भाषण म्हणजे विनीत पण निश्चयी, विनोदयुक्त पण सयुक्तिक अशा भाषणाचा एक नमुनाच म्हटला पाहिजे.

तुलसीदासांच्या या काव्यावरून हें स्पष्ट दिसून येतें कीं संस्कृत कवींचा त्यांनीं चांगलाच अभ्यास केलेला होता. तेजसां न वयः समीक्षते, याचें प्रतिबिंब " नाहीं ! अहो जगतिं तेज वयःप्रमाणीं ! " या पंक्तींत हुबेहुब पडलेलें आहे. अशीं अनेक स्थळें आहेत. मात्र परशु-

रामाच्या कालिदासानें केलेल्या वर्णनाशीं तुलसीदासांचें वर्णन ताडून पाहिल्यावर कालिदास मला सरस वाटला.

" तेजसः सपदि राशिरुत्थितः
प्रादुरास किल वाहिनीमुखे ।
यः ससोम इव धर्मदीधितिः
स द्विजिह्व इव चंदनद्रुमः ॥

या ओळींतला जोम तुलसीदासांच्या वर्णनांत साधला नाहीं. पण मला तुलसीदासांच्याहि कांहीं कांहीं उपमा अपूर्व वाटल्या. उदाहरणार्थ पुढील उपमा पाहा :

कथा श्रीरामाची, गमत करिंची टाळि सुभग ।
स्वनादें जीं देई, उडवुनि दुरी संशयखग ॥

किंवा

श्रीराम कीर्तिमय निर्मल जी पताका ।
आधारदंड तिज लक्ष्मण कीर्ति देखा ॥

रामलक्ष्मणांचें परस्पर पूरकत्व याहून मार्मिकपणानें आणि तें सुद्धां एका ओळींत कोणीं दाखवलें असेल असें वाटत नाहीं.

असो. हें पत्र कांहींच्या बाहीच लांबलें. पण मी तरी काय करूं ? तुलसीदासासारखा कवि, रामकथेसारखा विषय आणि डॉ. श्रीखंड्या-सारखा अनुवादक. वाचतां वाचतां प्रवास कधीं संपला तें कळलें नाहीं. ही जर माझी स्थिति तर लिहितांना संयम कसा राहावा ?

मला तर मोह होतो आहे कीं अजून तीन चार पानें लिहावींत. डॉ. श्रीखंड्यांच्या लेखणीला लिहून लिहून आतां अशी कांहीं सफाई आलेली आहे कीं पुसूं नकोस. त्यांची ही काव्य–कृति वाचीत

असतांना कधीं वामन पंडितांच्या व रघुनाथ पंडितांच्या नेटक्या व दणकट शैलीची तर कधीं मोरोपंतांच्या सालंकृत नटव्या शैलीची आठवण होते. तुलसीदासांचें हें पल्लेदार काव्य, मराठीमधील शब्द-संपत्ति व वृत्तसंपत्ति पूर्णपणें पचवलेला डॉक्टर श्रीखंडयांसारखा अनु-वादक होता म्हणूनच त्याला पेलतां आलें. हिंदीमधील हें अतिरम्य काव्य मराठी वाचकांना उपलब्ध करून देऊन डॉक्टरांनीं आपल्यावर फार मोठे उपकार करून ठेवले आहेत. त्यांच्या अनुवादाची गोडी साखरेच्या गोडीप्रमाणें आहे. साखरेची गोडी साखर खावी तेव्हां कळते तशीच डॉक्टरांच्या अनुवादाची गोडी पुस्तक वाचावें तेव्हांच कळेल, एरवीं नाहीं.

डॉक्टर पुन्हा आपल्याकडे येतील तोंपर्यंत तूं पुस्तक वाचून तयार अस म्हणजे झालें.

तुझा

**नाना**

मुंबई ३।५।५२

## १५ : कुमारी पॅट व कुमारी नानू

प्रिय सुधाताई,

तुला आज मी पत्र लिहितों आहे खरा पण मनाला शंका वाटते आहे ती अशी कीं तूं मला एव्हांना विसरली तर नसशील? कारण बऱ्याच दिवसांनीं कसलें बऱ्याच वर्षांनीं तुला मी आज लिहितों आहे. गुरुजींच्या निर्याणाची बातमी मला बडोद्यास कळली तेव्हां तुला मीं पत्र लिहिलें होतें. त्यावर हें आजचें पत्र! आतां कांही तूं गुरुजींच्या पत्रांतली लहानगी सुधा राहिली नसशील. खूप मोठी झाली असशील, कॉलेजांत जाऊं लागली असशील. जाडजूड ग्रंथ वाचूं लागली असशील. पण खरें सांगायचें तर तूं आतां मोठी झाली असशील असें वाटल्यामुळेंच तर तुला पत्र लिहिण्याची कल्पना मला सुचली.

इतके दिवस तूं शाळकरी मुलगी होतीस. गुरुजनांचें ऐकावें, घरच्या वडीलधाऱ्यांच्या शिस्तींत राहावें, त्यांच्याकडून स्वतःचें कोड-कौतुक करून घ्यावें आणि मुंगी होऊन साखर खावी; पुढें जरा कोठें अडीअडचण दिसली कीं वडीलधाऱ्यांच्या पंखांत शिरावें व त्या

पंखांच्या आसऱ्याला राहूनच बाहेरच्या जगावरून नजर फिरवावी. अशा प्रकारें तुम्हां मुलांमुलींचें जीवन तुम्ही शाळेंत आहां तोंपर्यंत चाललेलें असतें. त्या वयांतलें ज्ञान व तुमची शक्ति हीं लक्षांत घेतां जीवनाचें हें संरक्षित वळण अनिष्ट म्हणतां येणार नाहीं. पण कॉलेजा-पासून जीवनाच्या एका नव्या टप्प्याला सुरुवात होत असते. एक प्रकारें इतके दिवसांची सपाटीवरची व सावलींतली धोपटवाट संपून चढणीवरच्या नागमोडी पायवाटेला तेथपासून प्रारंभ होत असतो. कोणाचें बोट पकडून अथवा कोणाला बिलगून त्या वाटेवर फारसा कोणाचा निभाव लागण्यासारखा नाहीं कीं तेथला आनंद चाखतां येणार नाहीं. पण ज्याच्या अंगीं उत्साह असेल, स्वतंत्रपणें पाऊल उचलण्याची हिंमत असेल, जीवनाच्या त्या चढ्या माळावरचा मोकळा वारा सोस-ण्याची शक्ति असेल, त्याला या रस्त्यानें जातांनाचा यथेच्छ आनंद लुटतां येईल. त्याच्या क्षितिजाच्या सीमा वाढत जातील. सपाटीवरून न दिसलेल्या शोभा नजरेच्या टप्प्यांत येतील. जगाचें व आपलें परस्पर प्रमाण काय तें ध्यानांत येऊन फुकाची अहंता बऱ्याच प्रमा-णांत झडून जाईल आणि पायाखालचे दगडधोंडे व डोक्यावरचें ऊन, पाऊस, वारा यांच्या मारामुळें अंगांत शिरलेला नाजूकपणाहि निघून जाईल. पण हंसतमुखानें ही चढण चढण्याची वृत्ति तुम्हां तरुण-तरुणींत आहे का? मला निक्षून विचारावयाचें आहे कीं तुम्हां मुलींत आहे का? मला तरी तुझ्या वयाच्या मुलींच्याकडे पाहिलें कीं वाटतें कीं तुम्ही तर अधिकाधिक नाजुक-साजुक, झुळझुळीत नि लाडिकवाण्या होण्याच्या प्रयत्नांत आहांत. कोठल्याहि गोष्टींत अंग झोकून दिलें, असें नाहीं. धिप्पाडपणा असा मुळीं कशांतच नाहीं.

हंसलें तरी तें रुमालआडून; चालले तर चार फर्लांग; जेवलें तर अर्धी पोळी आणि बोललें तर करिअप्पा आणि कुमारप्पा यांतला फरक माहिती नसल्यासारखें ! त्यामुळें लाडिकवाण्या होण्याच्या तुमच्या प्रयत्नांत तुम्ही दीनवाण्या मात्र बनतां. आणि परदेशांतल्या तरुणींच्या मानानें इतक्या फिक्या आणि अनपढ वाटतां कीं बोलण्याची सोय नाहीं.

गेल्या महिन्या दोन महिन्यांत दोन परराष्ट्रांतल्या तरुणी माझ्या पाहण्यांत आल्या. एक होती उत्तर अमेरिकेंतल्या युनायटेड स्टेट्स-मधली आणि एक होती दक्षिण अमेरिकेंतल्या चिली देशाची रहिवासी. युनायटेड स्टेट्मधून आलेली ही तरुणी एका शेतकऱ्याची धट्टीकट्टी मुलगी होती. तेथल्या एका संस्थेच्या मदतीनें व येथल्या किसान सभेच्या बोलावण्यावरून हजारों मैलांचा प्रवास करून ती तेथें आली. तिला हिंदुस्थानांतली एकहि भाषा येत नव्हती. इंग्रजीसुद्धां ती अशा कांहीं चमत्कारिक लकबीनें बोले कीं तिच्या बोलण्यांतलें अर्धे आम्हांला समजत नसे आणि आम्ही बोललेल्यापैकीं तिला किती समजत होतें तें तिचें तिलाच ठाऊक ! तेथला पेहेराव निराळा, जेवणखाण निराळें, न्हाण्या-धुण्याच्या व्यवस्था निराळ्या. पण इतक्या सर्व अडचणी असूनहि सतत तीन आठवडे ती अमेरिकेन मुलगी उंड्रीला चाललेल्या सेवापथकाच्या कामावर राहिली. सैनिकांना चहाकॉफी मिळत नाहीं ना, मग तिनेंहि चहाकॉफीला स्पर्श केला नाहीं. ते गांवकऱ्यांनीं दिलेलें भाकरी-कोरड्यास खाऊन राहतात ना, मग तीहि त्याच अन्नावर राहिली. सेवापथकाचें काम संपल्यानंतर आठ दिवस ती इंदु केळकरकडे होती. अगदीं त्यांच्या घरांतलेंच एक

माणूस अशी राहात होती. ती साडी नेसली. तिनें कुंकू लावलें पुण्यांत अनेक मित्रांच्या गांठी—भेटी घेऊन आली. आणि हें सारें करीत असतांना तिनें जें जें कांहीं पाहिलें त्याचीं विस्तृत टिपणें लिहून काढून तीं टाइप करून, त्यांच्या प्रति जिकडच्या तिकडे रवाना करण्यांत कधीं कसूर केली नाहीं. आम्हांला खूष करण्यासाठीं का ती हें सगळें करीत होती ? एवढी सगळी यातायात करण्यामागचा तिचा उद्देश तरी काय होता ? मला वाटतें जगरहाटीचे नानाविध पैलू प्रत्यक्ष पाहण्याच्या दुर्दम्य इच्छेनेंच ती येथवर आली होती. येथून आतां ती सौराष्ट्रांत जाणार आहे आणि तेथून वर्ध्याला. वर्ध्यानंतर ती कोठें जाणार आहे तें मला ठाऊक नाहीं. पण मला तिच्या या अदम्य जिज्ञासेचें कौतुक वाटलें. या अमेरिकन मुलीचें नांव पॅट मॅकमोहन.

दुसरी जी चिलीची मुलगी सांगितली तिची हकीकत तर पॅट-पेक्षांहि विलक्षण आहे. तिनें कायद्याची एम्. ए. ची परीक्षा दिलेली आहे. तिला स्पॅनिश व इंग्रजी अशा दोन भाषा येतात. भारतांतील एक मुत्सद्दी श्री रामस्वामी मुदालियार दक्षिण अमेरिकेंत गेले होते, तेव्हां त्यांना स्वतःला स्पॅनिश येत नसल्यामुळें त्यांनीं ह्या मुलीला आपली मदतनीस म्हणून घेतलें श्री. रामस्वामींच्या समवेत ती जिनीव्हाला गेली. त्यांच्याकडचें काम संपल्यावर आणखी कोणा एका गृहस्थांची चिटणीस या नात्यानें ती पॅरिसला पोंचली. तेथून आतां ती हिंदुस्थानांत आली आहे. पुण्यास येण्याच्या आधीं ती रमणमहर्षींच्या आश्रमांत जाऊन आली, पाँडेचरीला अरविंदांचा आश्रम पाहून आली, विनोबाजींच्याबरोबर चार दिवस तिनें पायीं यात्रा करून भूदानयज्ञाचा

कार्यक्रम पाहिला. दिल्लीला जाऊन पंडितजींना भेटणें शक्य नाहीं असें आढळतांच इंदिरा गांधींची भेट घेऊन आली. तेथून वर्ध्याला गेली. मी गेलीं पंचेचाळीस वर्षे याच देशांत काढलीं पण अजून कांहीं पाँडेचरीला गेलेलों नाहीं, शांतिनिकेतन पाहिलेलें नाहीं कीं विनोबांच्या समवेत घालवण्यासाठीं चार दिवस बाजूला काढून ठेवण्याची मला बुद्धि झाली नाहीं. आतां येथून पुढें ही मुलगी कोठें ब्रह्मदेश, जावा, सुमात्रा वगैरे देशांत जाणार आहे म्हणे !

सुधा, तूं म्हणशील " तिच्यापाशीं पिशवीभर पैसे असतील म्हणून ती हिंडते आहे जगभर. आम्हांला द्या तसे पैसे, म्हणजे आम्ही देखील हिंडूं. " पण हें खरें नाहीं. ह्या चिलींच्या मुलीपाशीं पैसे नाहींत. ज्या देशांत ती जाईल तेथें कांहीं काम करते, ओळखीपाळखी काढते आणि थोडेसे पैसे मिळवून पुढच्या मुक्कामाला रवाना होते. तिच्यापाशीं सामान काय आहे तें तूं पाहिलें असतेंस तर तूं चकितच झाली असतीस. भाजीसाठीं अथवा रेशनसाठीं आपण जशा पिशव्या घेतों ना, तशा दोन पिशव्या हेंच तिचें सगळें सामान ! सामान इतकें थोडें कसें असें विचारल्यावर ती हंसून म्हणाली, " वर्ध्याला जाऊन मी हें शिकलें. माणसाच्या गरजा वस्तुतः किती थोडक्यांत भागतात तें मला तिथें गेल्यावर कळलें ! "

पॅटच्या काय किंवा ह्या मुलीच्या काय प्रवासांतल्या सुकरतेचें मुख्य सूत्र माणसांत मिसळण्याची शक्ति हें आहे असें मला तरी वाटतें. जगाच्या पाठीवर कोठेंहि जा, माणसाला माणसानें भिण्याचें काय कारण, ही त्यांची भूमिका असते. भाषा निराळी असेल तर असे ना ! पेहराव वेगळा असेल म्हणून काय झालें ? चालीरीति

भिन्न असतील म्हणून आपणांस संकोच कशाबद्दल ? भाषा निराळी आहे. पेहेराव वेगळा आहे. चालीरीति भिन्न आहेत. म्हणूनच तर परदेशांत जावयाचें आणि त्या निराळेपणांतला आनंद चाखावयाचा. सगळेंच सगळीकडे जर सारखें झालें तर एक जागा सोडून दुसऱ्या जागीं जायचें तरी कशासाठीं ? आपलें चुकेल माकेल पण आपण तें वाकड्या भावानें करीत नाहीं हें माहिती असल्यावर कोणत्याहि देशांतलीं माणसें ती चूक हंसण्यावारीच नेतील असा विश्वास ह्या मुलींच्या मनांत होता म्हणून त्यांनीं एवढ्या लांबच्या परदेशांत येण्याचें धाडस केलें, एरवीं हें धाडस त्यांना करवतें ना ! त्या विश्वासाच्या जोरावरच त्या मुली एवढ्या मोकळेपणानें वागत होत्या, परक्या समाजांत मिसळत होत्या.

एक प्रसंग तुला सांगतों. ही चिलियन मुलगी मुंबईस कोणा एकाकडे उतरली होती. तिच्या लक्षांत आलें कीं घरांतल्या एका म्हातारबुवांना फुलझाडांचा छंद आहे. पुण्यास आल्यावर श्री. पोचा म्हणून कोणी तरी बीबियाण्यांचे व्यापारी या शहरांत असतात आणि त्यांचा पत्ता हा असा, एवढें ज्ञान तिला कुठल्या तरी जाहिरातीवरून झालें. पण तेवढें तिला बस्स होतें. पुण्यांत ती रावसाहेब पटवर्धनांच्याकडे उतरली होती. सकाळीं केव्हां तरी घरांतून ती एकटीच बाहेर पडली आणि पोच्यांचें ठिकाण हुडकून काढून त्या मुंबईच्या म्हातारबुवांसाठीं थोडेसें बीं विकत घेऊन आली. तें बीं असेल रुपया आठ आण्याचें, पण त्यांत व्यक्त होणारी निरीक्षणशक्ति, आर्जव, मोकळेपणा किती मोलाचा आहे ? वाऱ्यावर अव्याहतपणें सळसळणाऱ्या चमकदार पिंपळाच्या पानासारख्या ह्या मुलीला

आम्ही जेव्हां विचारलें, " तुझें नांव काय ? " तेव्हां ती म्हणाली " माझं नांव हवंय् तुम्हांला ? बरं तर ऐका. माझं नांव नान् ! " एवढें म्हणून तिनें मिस्किलपणानें डोळे मिचकावले ! तिचें खरें नांव मला शेवटपर्यंत कळलेंच नाहीं.

याच्या उलट आमच्याकडच्या मुली. मला आठवतें मी एकदां पाटण्याहून परत येत होतों. माझ्याबरोबर नुकतीच बी. ए. ऑनर्समध्यें पास झालेली एक मुंबईची मुलगी होती. आमच्या समोरच्याच जागेवर न्यूझीलंडमधून येथें मिशनमध्यें काम करण्यासाठीं आलेल्या एक मध्यम वयाच्या बाई बसल्या होत्या. आगगाडीमध्यें तासन् तास न बोलतां एकमेकांसमोर तोंडाला कुलूप घालून बसणें कसें शक्य आहे ? हळू हळू आमच्या गप्पा सुरू झाल्या. कांहीं वेळानें त्या बाईनीं विचारलें कीं, " ह्या कोण ?" तेव्हां मीं त्या मुलीची ओळख करून दिली आणि सांगितलें, " ही खूप हुषार मुलगी आहे. ऑनर्समध्यें पास झाली आहे. " मग त्या बाईनीं तिला अनेक प्रश्न विचारले, पण ही मुलगी तोंड उघडील तर शपथ ! ' हूं ' किंवा ' ऊं-हूं ' याच्या व्यतिरिक्त एक सबंध असा शब्द कांहीं तिच्या तोंडांतून अखेरपर्यंत बाहेर पडला नाहीं. असें कां ? तर आपण इंग्रजी बोललों नि आपली चूक झाली तर, ही भीति !

सुधाताई, हा मी कांहीं मुलखावेगळा प्रकार सांगत नाहीं. ही नित्य अनुभवाची गोष्ट आहे. आतां आपल्या घरांतल्या मुली व बायका चहाच्या किंवा दुसऱ्या कसल्या तरी निमित्तानें चारचौघांत येऊन बसतात. पण धीटपणानें आणि नीटपणानें तेथल्या संभाषणांत भाग

घेण्याची ऐपत किती थोड्यांत दिसून येते ? त्यामुळें पुष्कळ सुशिक्षित बायका म्हणजे घराच्या सजावटींतले नगच असा प्रकार होऊन बसलेला आहे. वामनराव जोश्यांनीं रंगवलेली उत्तरा अथवा इंदु हीं पात्रें कादंबऱ्यांतलींच पात्रें म्हणावीं लागतील अशी स्थिति अजून तरी कायम आहे.

ही झाली साधी चारचौघां मित्रमंडळींमधल्या काव्य—शास्त्र—विनोदांत भाग घेण्याची गोष्ट. याच्याहि पलीकडे जाऊन जीवनाला त्यागपूर्वक व साहसपूर्वक विशेष वळण लावून घेणाऱ्या स्त्रिया तर आपल्याकडे फारच कमी आहेत. आमच्या पुण्याला गैरमार्गाला लागलेल्या त्यक्त, अनाथ अशा मुलींसाठीं व स्त्रियांसाठीं डेव्हिस नांवाच्या बाईंनीं चालविलेली एक संस्था कर्वे रस्त्यावर आहे. त्या बाई दोन वर्षांपूर्वीं वृद्ध होऊन स्वदेशीं गेल्या. त्या वेळीं ती संस्था चालवायला पुण्यासारख्या शहरांत बाई मिळेना ! शेवटीं त्यांनाच पुन्हा यावें लागलें तेव्हां कोठें संस्थेची गाडी रुळावर आली. गुरुजींचे एक तरुण मित्र मधु लिमये युरोपांतून माल-बोटीनें हिंदुस्थानाकडे यावयास निघाले होते, तेव्हां त्यांच्या बोटीवर दोन तीन स्वीडनच्या तरुणी व तरुण होते. ते आसाममधील डोंगरी जमातींमध्यें काम करण्यासाठीं निघाले होते. म्हणजे पाहा कोठें नॉर्वे—स्वीडन हे देश आणि कोठें आसाम ! डांग महाराष्ट्राचा म्हणून आपण सारखा टाहो फोडतों ना ? पण तेथें जाऊन आदिवासींमध्यें काम करण्यास दोन चार सुद्धां स्त्री-पुरुष मिळण्याची मारामार पडते आहे.

जगाच्या या टोकाच्या कॅनडामधून आणि त्या टोकाच्या न्यूझीलंडमधून मात्र चांगल्या शिकल्यासवरलेल्या बायका व पुरुष अशा

ठिकाणीं वस्ती करून वर्षानुवर्षें राहण्यास तयार होतात. त्यांच्यासाठीं शाळा उघडतात, त्यांना औषधपाणी देतात, त्यांच्या भाषांचा रीति-रिवाजांचा सूक्ष्म अभ्यास करतात, हें नवल नाहीं काय? दरवर्षी स्वित्झर्लंडमधून, फ्रान्समधून गौरीशंकर चढण्यासाठीं तुकड्या येत असतात. कोणी उत्तर ध्रुवावर जातात तर कोणी दक्षिण ध्रुवावर. कोणी साधें होडकें घेऊन इंग्लंडहून हिंदुस्थानांत यावयास निघतात, तर कोणी लाकडाच्या ओंडक्यांचा तराफा भर समुद्रांत घालून सबंध प्रशांत महासागर ओलांडण्याचें धाडस करतात! साहस हें मनुष्याच्या जीवनाला चव आणणारें मीठ आहे. पण आपण आपलें आळणीच राहणें पसंत करतों! भारतांतल्या सारखें आळणी जीवन जगाच्या पाठीवर क्वचितच कोठें असेल!

मला ठाऊक आहे सुधा, कीं तूं हें सगळें वाचल्यावर म्हणशील कीं "आम्ही देखील परदेशांतल्या तरुणतरुणींसारखीं कामें करून दाखवूं. पण आमच्या घरांतून अशा प्रवृत्तीचें कौतुक होईल का? तरुणतरुणींमध्यें अशी साहसी जीवनाची आवड निर्माण होण्याजोगें वातावरण भारतांतल्या किती कुटुंबांत असतें?" हें मी बिनतक्रार कबूल करतों कीं आमचें सर्व कुटुंबजीवनच फार खुरटलेलें आहे आणि आमच्या घरांतलीं वडील माणसें आपल्या मुलांतल्या धाडसी प्रवृत्ति मारण्याचाच उद्योग अधिक करीत असतात. पण तुला किंवा तुझ्या-सारख्या तरुण माणसांना ज्येष्ठांच्या माथीं दोष चिकटवून मोकळें होतां आलें म्हणून आपली प्रगति का त्यामुळें साधणार आहे? सिंहाचा छावा हत्तीवर पहिल्यांदां चालून जातो तेव्हां आई-बापांची परवानगी मागतो कीं काय? घरांत बांधून पडलेल्या तुम्हां स्त्रियांना

महात्मा फुल्यांनीं, आगरकरांनीं, कर्व्यांनीं, गांधीजींनीं मोकळें केलें, शिक्षित केलें; आतां पुढचा चढणीचा मार्ग तुम्हीच चढला पाहिजे आणि तोहि आनंदानें चढला पाहिजे.

पॅट आणि नान् तुला जर मुंबईला भेटल्या तर पाहा, न भेटल्या तर ह्या पत्राची प्रत तरी त्यांना पाठव म्हणजे त्यांच्यासारखे गुण जरी आम्हां लोकांत नसले तरी त्यांची चहा तरी आम्हांला आहे एवढें त्यांना कळेल आणि त्यांना बरें वाटेल.

माझ्या पत्राचें उत्तर पाठवशील का ? अवश्य पाठव.

तुझा,

**नाना**

पुणें, २४।७।५२